# महाराष्ट्र मेघदूत

अर्थात्

## महाकवि श्रीकालिदास याच्या मेघदूत काव्याचें मराठी समवृत्त व समश्लोकी भाषान्तर

श्री. शांताराम आत्माराम सबनीस

सॉलिसिटर, हायकोर्ट, मुंबई.

प्रथमावृत्ति

प्रति १०००

सन १९३८.

| कागदी बाइन्डिङ्ग | किंमत | कापडी बाइन्डिङ्ग |
| --- | --- | --- |
| दीड रुपया | पोष्टेज निराळें | दोन रुपये |

# अर्पणपत्रिका

जी ज्ञानेशमयूरवामनतुका इत्यादि वागीश्वरीं ।
संवर्धोनि, तरावया भव दिली नौका जनां, वैखरी ॥
होतां दुर्गत, आदरें भजति जे तीर्तें त्यजोनी स्पृहा ।
त्या मान्यां विबुधांसि अर्पित असें सप्रेम मी यत्न हा ॥

# अभिनंदन

रा. रा. सबनीस यांस कृ. सा. न. वि. वि:—

आपण " महाराष्ट्र मेघदूत " हें पुस्तक पाठवलें तें पोंचलें. समग्र वाचून पाहिलें. आपण विनंति केल्याप्रमाणें त्याला प्रस्तावना न लिहितां, त्यावरील माझा अभिप्राय कळवितों.

कायद्याची कटकट व वकिलांची वटवट यांनीं दिवसभर विटून गेलेल्या मेंदूला विश्रांति व करमणूक आवश्यक असते. पैकीं विश्रांति ही व्यवसाय बदलूनच मिळते. केवळ रिकामें बसून मिळत नाहीं. आणि करमणूक लाभण्यासारखा नवा व्यवसाय हुडकून काढितां आला तर तें उत्तमच. श्रमपीडितांनां करमणूक मिळविण्याचे मार्ग किती असतात हें प्रसिद्धच आहे. पण त्या अनेक मार्गांपैकीं कोण कोणता मार्ग पत्करतो यावरूनच त्याची अभिरुचि समजून येते.

पूर्वींच्या आपल्या ' रत्नावली ' ग्रंथावरून आपण करमणुकीचा कोणता मार्ग पसंत करितां हें कळून आलेंच आहे. त्याच मार्गानें जाऊन आपण आतां मेघदूताचें समवृत्त भाषांतर केलें हें पाहून आनंद होतो, आणि त्याकरितां मी आपलें मन:पूर्वक अभिनंदन करितों.

मेघदूताच्या काव्यगुणासंबंधानें दुमत होणें शक्यच नाहीं. त्यानें देशींविदेशी रसिकांना कायमचें वेड लावून ठेवलें आहे. अशा काव्याचा आस्वाद मराठी वाचकांना देण्याचें काम हें सहृदयतेच्या दृष्टीनें मी परोपकाराचेंच समजतों. हें काम प्रथम कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं केलें. त्यांची भाषा प्रासादिक आणि लहान मुलांनांही कळण्यासारखी साधली आहे. त्यानंतर इतरही कांहीं प्रयत्न झाले. परंतु ते कृष्णशास्त्री यांच्याइतके

---

या अभिनंदनांत निर्दिष्ट केलेलीं दोषस्थळें व शंका यांचा संक्षिप्त खुलासा वाचकांच्या सोईसाठीं, श्रीयुत केळकर यांच्या परवानगीनें, खालीं स्वतंत्र टीपा देऊन केला आहे.

—ग्रंथकर्ता.

यशस्वी झाले नाहींत असें मला वाटतें. याचें एक कारण त्यांनीं साध्या व उदार अशा साकीवृत्ताचा उपयोग केला. दामले व बोरवणकर यांचीं भाषांतरें माझ्या पाहण्यांत नाहींत; लेले यांचें आहे. पण तुम्ही व लेले यांचीं समवृत्त भाषांतरें आणि कृष्णशास्त्री यांचें भाषांतर यांची तुलना करितां निवळ मराठी वाचकांच्या दृष्टीनें कृष्णशास्त्री यांचेंच कार्य अधिक उपयुक्त झालें आहे, असें म्हटल्याशिवाय मला राहवत नाहीं. पण यांत दोष असला तर समवृत्तच भाषांतर करण्याचें बंधन घालून घेतल्याचा आहे. कोणताही महत्त्वाचा शब्द न सोडतां, सोपी मराठी भाषा वापरणें कठीण नाहीं; पण वृत्त गणबद्ध, आणि त्यांतच यमकाच्या अडचणीची भर, यामुळें तंतोतंत समवृत्त भाषांतर करणें अशक्यप्राय होऊन जातें. लेले यांना ही अडचण भासल्यानें त्यांना कित्येक श्लोक चार चरणांऐवजीं [१]सहा चरण घालून सिद्ध करावे लागले. चतुष्पाद पशुऐवजीं, षट्पद भ्रमर हा मधुसेवनाच्या दृष्टीनें अधिक यशस्वी ठरल्यास काय नवल? पण तुम्ही तीही सवलत घेतली नाहीं. आणि ह्या सर्व अडचणी सांभाळून बरेंच यथार्थ आणि सुगम भाषांतर केलें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

कवितेला यमक असावें ह्याविषयीं आग्रह धरणारांपैकीं मी एक आहें. पण अनुकूल वृत्ताची सवलत घेतल्यास यमक संभाळूनहि यथार्थ व प्रासादिक भाषांतर करणें शक्य आहे. यमकाची अडचण तुमचे लक्षांत आलीच आहे. ती अडचण सोपी करण्याकरितां गुजराथी कवींनीं नुसतें स्वराक्षरी यमक साधण्याची नवी प्रथा पाडल्याबद्दल तुम्ही त्यांना दोष देतां. पण

---

१ श्लोकांतील चार ओळींचें भाषांतर, सहा, आठ किंवा बारा ओळींनीं केल्यास ( मग तें समवृत्त असो कीं अन्यवृत्त असो) त्यास विस्कळितपणा येऊन, **रूपांतराचें** स्वरूप येतें, म्हणूनच आम्ही ज्यास्त कटकटीचें समश्लोकी भाषांतर पसंत केलें; असमश्लोकी भाषांतरांत मुळांत नसलेलें बरेंच घालावें लागतें, व मुळांतलें कमी होतें, हें अशीं भाषांतरें मुळाशीं काळजी-पूर्वक ताडून पाहिल्यास सहज लक्ष्यांत येईल. श्री. चिपळूणकर यांनीं आपल्या मेघदूताच्या प्रस्तावनेंत ही गोष्ट प्राञ्जलपणें कबूल केली आहे. शिवाय एका ओळीचें सहा अगर अधिक ओळींनीं भाषांतर केल्यानेंही प्रसंगीं सदृशनादवाही व्यंजनांचे ( क ख; ल ळ; न ण; ) यमक साधणें भाग येतेंच व दहा अकरा अक्षरांचे समासही सुटत नाहींत ! अशा तऱ्हेच्या अवघड भाषांतरांत हे दोष जवळजवळ अपरिहार्यच दिसतात, व हे सर्व अजीबात टाळावयाचे असल्यास गद्य भाषांतराशिवाय दुसरा इलाज नाहीं.

उलट सदृशनादवाही व्यंजनांची सवलत तुम्ही मागतां, ही तरी नवी प्रथाच नव्हे काय? तुमच्या एका श्लोकांत 'ते' या अक्षराचें यमक 'दे' या अक्षरानें तुम्ही साधूं पाहिलें आहे. 'गे' याला 'घे' याचें यमक जोडलें आहे, 'ही' याचें यमक 'यी' यानें साधलें आहे. म्हणून असें वाटतें, कीं वृत्ताची अडचण पत्करून यमकाची सवलत मागण्यापेक्षां, यमक साधण्याकरितां वृत्ताची सवलत घेणें अधिक बरें. वृत्ताप्रमाणें यमक हें ऐच्छिक होऊं शकत नाहीं. वृत्तांत सुद्धां लहान मोठें सुलभ, अवघड, असा भेद आहेच. पण वृत्तच घ्यावयाचें तर तें गणवृत्तापेक्षां मात्रावृत्त बरें. मुद्दा हा आहे, कीं मूळ काव्यांतील अर्थ, रस व अलंकार यांचें चित्र भाषांतरांत बरोबर प्रतिबिंबित व्हावयाचें तर मार्गांतील इतर अडचणी जितक्या काढून टाकतां येतील तितक्या बऱ्या.

तुम्ही भाषांतरासंबंधानें मोठ्या खोलींतील सामान लहान खोलींत दडपून बसविण्याचा जो दाखला दिला आहे, तो बरोबर आहे. त्यांतहि फिरून अडचण ही, कीं संस्कृतांत मोठमोठे समास खपतात, तसे मराठींत खपत नाहींत.

---

२ ही प्रथा आम्ही पाडलेली नाहीं; जुनीच आहे. आम्हाला उपयुक्त वाटली म्हणून प्रस्तावनेंत तिचा फक्त निर्देश केला आहे. प्रसिद्ध कवींनीं देखील सदृशनादवाही व्यंजनांचा यमकासाठीं अनेक वेळां उपयोग केला आहे. स्थलाभावामुळें कांहीं थोडींच उदाहरणें देत आहों.

(अ) जागजागीं आहेत वीर कोटी । भले झुंझारहि शक्ति जयां मोठी ( रघुनाथ पंडित; नलदमयंती स्व. )

(आ) नको पाहूं तूं नोवरी नळाशी । मीच भावें होईन सत्यदासी ( ,, ,, )

( इ ) प्रथमवृष्टिनें तुष्ट भूमिचा हुंगुनि मधुर सुगंध ।
तव मार्गातें मनीं तर्कितिल हर्षित वनीं कुरंग ॥ (चिपळूणकर; मेघदूत भाषांतर–साकी५०)

( येथें 'ध' व 'ग' हीं व्यंजनें एका वर्गांतील देखील नाहींत ! )

( ई ) येतां तिचा ओघ मिळूनि दोघी । प्रेमें पुढें चालती पूर्वभागीं ॥ ( नरहरीकृत गंगालहरी )

( उ ) सोळा सहस्रशत एक तुम्हीं आठ जणीं नायिका ।
कार्यवादु तो कृष्ण कसा करि पूर्णमनोरथ सखा ॥ ( प्रभाकर: लक्ष्मीपार्वतीसंवाद )

निवळ स्वराक्षरांच्याच यमकाचा उपयोग मराठींत केला जात नाहीं हें युक्तच आहे; कारण स्वर हे सहायक असून उच्चार व्यंजनाचाच असतो.

समास तोडून व्याकरणाचे प्रत्यय लावून लिहावयाचें म्हणजे सहजच अधिक विस्तार होतो. ही अडचण तुम्हांला पदोपदीं भासलेलीच आहे. यामुळें कित्येक श्लोकांत तुम्हांला मुळांतील समास जसेच्या तसेच ठेवावे लागले आहेत. पण तुम्ही तरी काय करणार? उलट उत्तरमेघांतील पंधराव्या श्लोकाप्रमाणें मुळांत नाहीं असाहि 'तद्वदनैंमदिरापानवांछा' एवढा समास घालावा लागला. म्हणजे ओळींत सुटे शब्द दोन सहा अक्षरांत, आणि एकच समास अकरा अक्षरांचा, असें झालें आहे. मला सुचवावयाचें तें इतकेंच, कीं समश्लोकवृत्त ठेवावयाचें असलें, तरी जरुरीप्रमाणें श्लोकाच्या चार ओळीं-ऐवजीं सहा कराव्या किंवा एकाचे दोन श्लोकहि करावे. पण महत्वाचा असा कोणताच भाग वगळूं नये. आधींच कवीच्या मनांत असतें त्याहून थोडें कमीच श्लोकांत उतरतें; आणि त्यांतूनहि कांहीं शब्द गळले तर ती तितकी हानिच होय. प्रांजलपणें सोडावे लागलेल्या शब्दांखालीं काळी जाडी रेघ छापल्यामुळें वाचकाला सूचना मिळते ही गोष्ट निराळी. असो.

कांहीं म्हटलें तरी मूळ संस्कृतापेक्षां तुमचा मराठी मेघदूत अधिक सुबोध झाला आहे यांत शंका नाहीं. संस्कृताच्या अवघडपणामुळें जो मुळाकडे पाहून थबकेल, तो मराठी थोड्याशा प्रयत्नानें तरी समजूं शकेल. तुमच्या भाषांतरांतील कांहीं शब्द संस्कृत असले तरी फारसे परिचित नाहींत असे घालावे लागले आहेत. मराठी भाषा एका

३ मराठी पद्यरचनेंत समासांचा कितपत उपयोग करावा या प्रश्नाचा खुलासा प्रस्तावनेंत केलाच आहे मोरोपंतासारख्या मराठी कवींनींदेखील संबंध ओळीच्या ओळी संस्कृत समासानें रचलेल्या आढळतील. उदाहरणार्थः—

(अ) दुर्योधनप्रमुखखळखद्योततदन्यपद्मभानु निघे । ( मोरोपंत; कृष्णशिष्टाई उद्योगपर्व )

(आ) सुखसंततिसुकृतर्द्धिप्रीतिश्रीपुण्यकीर्ति या लाभें । ( ,, ,, ,, ).

( इ ) लोकां होईल सपंकशृंगत्र्यंबकवृषभभ्रान्ती ( चिपळूणकरांचें मेघदूत भाषांतर ) साकी १३३.

अशीं अनेक उदाहरणें देतां येतील. बाकी मराठी पद्यरचनेंत यथाशक्य संस्कृत समास टाळावे याविषयीं दुमत होणें शक्य नाहीं.

४ या भाषांतरांत सोडलेल्या शब्दांची मूळ श्लोकांच्या अर्थबोधास फारशी उपयुक्तता नव्हती; ते विद्यार्थ्यांच्या सोयीसाठीं अधोरेखाङ्कित केले आहेत. निवळ गौण शब्दच सोडले असल्यामुळें रसहानि किंवा अर्थहानि बहुशः झालेली नाहीं. फक्त ३०।३५ श्लोकांतच नाइलाजानें कांहीं किरकोळ शब्द सोडावे लागले आहेत.

दृष्टीनें पाहतां संस्कृतमय खरी, तथापि परिचित व अपरिचित शब्द हा भेद राहतोच. 'पुरा' हा तर खुद्द संस्कृतच शब्द आहे. तसेंच इतर शब्द. "दिवा" हा शब्द तसाच. पण ते शब्द शुद्ध तरी आहेत. परंतु कांहीं मराठी शब्दही सोयीकरितां अशुद्ध वापरले गेले आहेत असें वाटतें. उदाहरणार्थः—'काढेली', 'तदिय' ( तदीय ), 'गाल्या' ( गाइलेल्या ). 'वेगळावें' हें नवीन क्रियापद बनविलेलें दिसतें. तसेंच 'भासे पात्र पृथुतर' या ठिकाणीं 'पृ' हें द्वित्त अक्षर जोडाक्षर असें मानलें आहे ; परंतु 'पृ' हें लघु एक मात्रेचेंच अक्षर आहे. उत्तरमेघांतील पहिल्या श्लोकांत 'वाडे'

---

५ 'पुरा' हा निवळ संस्कृत शब्द टाळण्यासाठीं पू. मे. श्लो. १७ चरण १ बदलला आहे. ( शुद्धिपत्र पहा. )

"दिवा" हा निवळ संस्कृत बदलण्यासाठीं शब्द उ. मे. श्लो. ४५ दुसरी ओळ बदलली आहे; [ शुद्धिपत्र पहा. ]

या दुसऱ्या फेरफारामुळें "सर्वावस्थासु" हा मुळांतील शब्दसुद्धां सुटत नाहीं. चिपळूणकरांनाही काव्याच्या सोईसाठीं "करितिल खचित विगीर्णे" ( म्ह० गिळतील ) असा अपरिचित शब्दप्रयोग करणें भाग पडलें आहे. [ साकी ३९ पहा. ]

६ अवघड पद्यरचनेच्या कामीं क्वचित् प्रसंगीं नाइलाजानें थोडाबहुत व्याकरणशास्त्राचा उपमर्द झाला असल्यास, प्रत्यक्ष कालिदासाच्या समर्थनार्थ मल्लिनाथानें योजलेल्या "अपि-माषं मषं कुर्यात् छंदोभङ्गं त्यजेद्गिराम्" ( रघु. स. १९ श्लो. २३ संबंधीं टीका ) या आप्तवाक्यानें मनाचें समाधान करणें भाग आहे.

या सवलतीमुळें सैंवर ( स्वयंवर ), साख्य ( सख्य ), यखादा ( येखादा ), असेही शब्द मराठी पद्यवाङ्मयांत सांपडतात. मराठी पद्यरचनेचें व्याकरणही, गद्य व्याकरणापेक्षां कांहीं अंशीं निराळें आहे. ( श्री. कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचा "मराठी कवितेंतील व्याकरणाचे विशेष" हा निबंध पहावा ) "निजेला" "रागेजला"—असे प्रयोग मराठी पद्यसंग्रहांत अनेकदां—आढळतात.

७ "वेगळावें" असा क्रियापदार्थी प्रयोग जुनाच आहे. आमचा नवीन नाहीं.

( अ ) करिति विक्षणवारा त्या सख्या वेगळाल्या ( नलदमयंती स्वयं. )

( आ ) तदितर खग भेणें वेगळाले पळाले। ( ,, ,, ,, )

८ ही चूक दुरुस्त केली आहे. [ शुद्धिपत्र पहा. ]

असा शब्द पडला आहे; तो बहुधा ‘वाटे’[९] या ऐवजीं चुकून पडला असावा. आक्रोशार्थीं ‘आकस’ हा शब्द अपभ्रंशकोशांत तरी सांपडतो[१०] काय ?

एकादा शब्द तुमची टीप नसल्यामुळें मला कळला नाहीं. उदाहरणार्थः पृ. १६ श्लोक ३६ यांतील ‘भुजजशा’[११]. असो. किरकोळ दोष दिसले ते दाखविले. तथापि कांहीं श्लोक फार चांगले साधले असून प्रासादिकहि उतरले आहेत. उदाहरणार्थः पृ. ६ श्लो. १३; पृ. १० श्लोक २१–२२; पृ. १२ श्लो. २६; पृ. २६ श्लो. ५६; (हा श्लोक तर फारच सुंदर आहे.) पृ. ३२ श्लो. २; पृ. ४० श्लो. २१; पृ. ४२ श्लो. २५; पृ. ४६ श्लो. ३१; पृ. ५० श्लो. ४६; पृ. ५२ श्लो. ४६ व ४८; पृ. ५४ श्लो. ५१.

पण मराठी वाचकांच्या दृष्टीनें, भाषांतरांत जें उणें पडलें, तें सर्वच्या सर्व तुम्ही आपल्या सुंदर प्रस्तावनेनें भरून काढलें आहे; कारण त्यांतील पृथक्करण इतकें सूक्ष्म झालें आहे, कीं मूळ मेघदूत वाचतानां ज्या सौंदर्य-स्थलांवरून वाचक आपल्या ढोबळ व बोथट मनानें उड्या मारून गेला असता, तीं तुम्ही त्याला दाखवून दिलीं आहेत. तसेंच, टीपांतून कालि-दासाच्या इतर काव्यांतील जीं समानार्थक स्थळें तुम्हीं दाखवून दिलीं आहेत, त्यांच्या योगानें कवीच्या मनावर जसा प्रकाश पडतो, तसाच कालिदासविषयक तुमच्या प्रेमपूर्वक अध्ययनावरही प्रकाश पडतो हें सांगितल्यावांचून राहवत नाहीं. हें समश्लोकी भाषांतर करितांना तुमच्या बुद्धीला किती श्रम पडले व कुशलता प्रकट करावी लागली याची जाणीव मला पूर्ण आहे. एकच उदाहरण देतों. पूर्वमेघांतील सहाव्या श्लोकांतील शेवटच्या ओळींतला अर्थान्तरन्यास मी एकाच ओळींत बसविण्याचा प्रयत्न केला पण तो मला साधला नाहीं. तुमच्या भाषांतरांत तो यशस्वी रीतीनें साधलेला आहे.

पुणें, १२–२–१९३८. न. चिं. केळकर.

---

९ ‘वाडे’ असाच शब्द आहे; “वाटे” नाहीं. “वाडे” हें “प्रासाद” याचें भाषांतर आहे.

१० कोशांत सांपडत नाहीं.

११ “भुजजशा” म्ह० हातासारख्या; “भुज” म्ह० हात; ‘जशा’ म्ह० सारख्या.

# महाराष्ट्र मेघदूत

## प्रस्तावना

"अथावाच्यः सर्वः स्वमतिपरिणामावधि गृणन् ।
"ममाप्यस्मिन्यत्ने बुध ! निरपवादः परिकरः ॥"

महिम्नस्तोत्र ( पुष्पदंत )
( थोडा फेरफार करून. )

**माझे** मित्र डॉ. म. द. जोशी यांजबरोबर मेघदूत काव्य १९३६ च्या एप्रिल महिन्याच्या सुमारास वाचीत असतां, त्याचें समश्लोकी व समवृत्त मराठी भाषांतर करण्याची कल्पना प्रथमतः मनांत उद्भवली.

**काव्याचें महत्त्व.**

मेघदूत हें महाकवि कालिदासाच्या काव्यसंग्रहांतील अत्युत्कृष्ट व विख्यात काव्य आहे. हें खंडकाव्य असूनही, कोणत्याही महाकाव्याची सहज बरोबरी करूं शकेल, यांत तिळमात्र संदेह नाहीं. प्राचीन कालीं या काव्याची लोकप्रियता अमर्याद होती. हें फक्त ११५ मंदाक्रान्तावृत्तांतील श्लोकांचें सर्वांगसुंदर काव्य आहे. आकारानें लहान व वस्तुतः खंडकाव्य असूनही, दण्डी वगैरे साहित्यशास्त्रकार यास सहावें महाकाव्य समजतात. कालिदासाच्या जगद्विजयी प्रतिभेनें या सर्वोत्कृष्ट काव्यास जन्म देऊन, कीर्तिमंदिराचें उच्चतम शिखर गांठलें असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. परमेश्वरानें शून्यापासून विश्वनिर्मिति केली किंवा विशेष परिचयांतील दृष्टांत देणें झाल्यास, कोळी ज्याप्रमाणें बाह्यद्रव्याची यत्किंचितही अपेक्षा न करतां, स्वदेहांतून लागतील तितके तंतू काढून, जाळ्यांमागून जाळीं विणीत जातो, तशाच तऱ्हेची ही अद्वितीय कविकृति आहे. कोणतेंही दुसरें काव्य किंवा महाकाव्य अशा रीतीनें केवळ कल्पनेच्या अधिष्ठानावर रचिलेलें नाहीं, ही एकच

गोष्ट त्याचें अद्वितीयत्व सिद्ध करण्यास पुरेशी आहे. रचनाचातुर्य, वाणीची अत्युच्च संस्कृति, प्रतिभावैभव, व नादमाधुर्य, हा गुणसमुच्चय लक्षांत घेतां,

**" शब्दब्रह्मविदः कवेः परिणतप्रज्ञस्य वाणीमिमाम् "**

असा अभिप्राय या काव्यास दिला तर ती अतिशयोक्ति होणार नाहीं.

**छायाकाव्यें.**

"सर्वोत्तम प्रशंसा म्हणजे अनुकरण" या न्यायानें या काव्याचीं अनेक अनुकरणात्मक छायाकाव्यें पुढील सात आठ शतकांत झालीं, या एकाच गोष्टीवरून, त्याच्या देशव्यापी प्रसिद्धीची, व वाढत्या लोकप्रियतेची कांहींशी कल्पना होते. नेमीदूत, पवनदूत, हंसदूत, कोकिलदूत, उद्धवदूत, मनोदूत, इंदुदूत, रथांकदूत वगैरे सुमारें १३–१४ ग्रंथ या सुंदर काव्याचें अभिमानपूर्वक अनुकरण करण्याच्या उद्देशानें रचिले गेले आहेत. या व इतर ग्रंथांत मेघदूतांतील कल्पना व शब्दप्रयोग यांचा उघड उघड अनुवाद केलेला आढळतो.*

---

* ( १ ) गन्तुं देशान्तरमथ मघावन्यथैव प्रवृत्तम् ।
गाढोत्कण्ठा मलयपवनं सप्रणामं ययाचे ॥ पवनदूत श्लो. ३

( २ ) त्वत्तः प्राणाः सकलजगतां दक्षिणस्त्वं प्रकृत्या ।
अंघालं त्वां पवन मनसोऽनन्तरं व्याहरन्ति ॥
तस्मादेव त्वयि खलु मया संप्रणीतोऽर्थिभावः ।
प्रायो भिक्षा भवति विफला नैव युष्मद्विधेषु ॥ पवनदूत श्लोक. ४

( ३ ) संसाराब्धेः प्रतरणविधावान्जनेयं यथान्यं ।
हंसं कश्चित् सहचरमसौ मानसस्थं ददर्श ॥ हंससंदेश श्लो. २

( ४ ) आत्मोदन्तं प्रियजनमसौ प्रापयिष्यन् प्रहृष्टः ।
क्लृप्तार्घाय प्रशमकुसुमैः स्वस्ति तस्मै जगाद ॥ हंससंदेश श्लो. ४

( ५ ) आदौ तावच्छृणु कथयतो मार्गमव्याहतम् मे ।
सन्देशं ते श्रवणसुभगं सौम्य वक्ष्यामि पश्चात् ॥ हंससंदेश श्लो. ९

( ६ ) कुर्वन्नस्य स्मरति जडधीस्तापसानाम् मनोज्ञां ।
स्निग्धच्छाया तरुषु वसतिं रामगिर्याश्रमेषु ॥ पार्श्वाभ्युदय श्लो. ४

( ७ ) योगासक्तं सजलजलदश्यामलं राजपुत्री ।
वप्रक्रीडा परिणतगजप्रेक्षणीयं ददर्श ॥ नेमीदूत श्लो. २

आठव्या शतकांत होऊन गेलेल्या जिनसेन कवीच्या ' पार्श्वाभ्युदय ' नांवाच्या काव्यांत प्रत्येक श्लोकाच्या चवथ्या ओळीसाठीं मेघदूताचा एक एक चरण तशाचातसाच घेतला आहे. तसेंच नेमीदूत काव्यांतील प्रत्येक श्लोकाचा चवथा चरण व मेघदूतांतील प्रत्येक श्लोकाचा चवथा चरण एकच आहेत.

**मेघदूतावरील टीका.**

तसेंच या काव्यावर सुमारें अठरा टीका लिहिल्या गेल्या आहेत, त्या सर्वांत जुनी वल्लभदेवाची असून, मल्लीनाथाची सर्वांत प्रसिद्ध आहे. शिवाय, ' सुमतिविजय ', ' सारोद्धारिणी ', ' सरस्वतीतीर्थे ' वगैरे टीकाही बऱ्याच उपयोगी आहेत.

**मराठी भाषांतरें**

कै. कृष्णशास्त्री चिपळुणकरांनीं केलेलें साकीबद्ध रूपान्तर कांहीं वर्षांपूर्वी माझ्या नजरेखालून गेलेलें होतें. शास्त्रीमजकुरांची विद्वत्ता व भाषाप्रभुत्व विश्रुतच आहे. त्यांचा प्रयत्न शब्दशः भाषांतर करण्याचा नव्हता, तरी त्यांची भाषा साधी व प्रासादिक आहे. मेघदूताचीं दुसरीं भाषान्तरें अगर रूपान्तरें अस्तित्वांत असल्याबद्दलची चौकशी मी. मुंबईतील एकदोन नामांकित मराठी पुस्तक-विक्रेत्यांच्या दुकानांत केली. पण रा. रा रामचंद्र गणेश बोरवणकर, व कै. कृष्णशास्त्री चिपळुणकर यांच्या पुस्तकांखेरीजकरून दुसरे या प्रकारचे प्रयत्न ऐकिवांत नसल्याचें समजलें. पैकीं बोरवणकरांचें गद्य भाषांतर, व प्रस्तावना उत्कृष्ट व विद्वत्ताप्रचुर आहे.

माझें भाषांतर पुरें झाल्यावर माझे मित्र रा. भालचंद्रराव सुकथनकर ( सॉलिसिटर ) यांनीं तें पाहून, दुसरेंहि एक भाषान्तर आपल्या पाहण्यांत असल्याची माहिती दिली. तिच्या अनुरोधानें शोध करितां, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत रा. रा. दामले व रा. रा. लेले यांचे मेघदूतभाषान्तराचे पद्यात्मक प्रयत्न दोन लहानशा जीर्ण पुस्तकांच्या रूपानें हातीं आले. त्या दोन्ही पुस्तकांच्या प्रती सध्यां उपलब्ध नाहींत. रा. लेले यांनीं मंदाक्रान्तावृत्त वापरलें आहे, पण मूळ श्लोकांतील चार चरणांबद्दल, सहा,

आठ, व कधीं बारा ओळींचाही उपयोग मुळांतील अर्थ विशद करण्यासाठीं केला आहे. रा. दामल्यांचें भाषान्तर समश्लोकी आहे; पण तें वाचतानां मेघदूतासारख्या गीर्वाण भाषेच्या ललामभूत ग्रंथाचें समश्लोकी भाषान्तर, मराठीच्या प्रचलित वाक्प्रचारास विशेष धक्का न लावतां, समाधानकारक रीतीनें करणें किती कठीण आहे, याचा प्रत्यय वाचकास दर श्लोकागणीक येतो. दोन्ही भाषान्तरें शास्त्रीबुवांच्या भाषांतरावरच भिस्त ठेवून केलीं आहेत, हें तीं वाचीत असतां लक्षांत आल्याखेरीज रहात नाहीं.

मेघदूतासारख्या सर्वमान्य ग्रंथाच्या समश्लोकी भाषान्तराचा मराठींत आजतागायत एकच प्रयत्न झाला, ही गोष्ट महाराष्ट्रास फारशी भूषणावह नाहीं. वास्तविक पहातां मराठीचा व संस्कृत भाषेचा ऋणानुबंध इतर तज्जातीय भाषांपेक्षां जास्त निकट व जिव्हाळ्याचा आहे, हें कोणीही कबूल करील. प्रत्येक भाषान्तरांत किंवा रूपान्तरांत कांहीं वैय्यक्तिक वैशिष्ट्य असतेंच असतें. तेव्हां अशा प्रकारच्या प्रयत्नांनीं, मराठी भाषेचा परिपोष होण्यास निःसंदेह मदत होते.

**गुजराथी भाषान्तरें**

गुजराथी भाषेंत मेघदूताचीं सहासात भाषान्तरें झालीं आहेत, हें गुजराथी साहित्यिकांस अत्यंत भूषणावह आहे. शिवाय दोन गुजराथी कवींनीं 'अनिलदूत' व 'पत्रदूत' या नांवाचीं मेघदूतावरील छायाकाव्यें रचिल्याचेंही समजतें. अर्थात्, कालिदासाच्या या काव्याचें कौतुक महाराष्ट्रापेक्षां गुजराथेनेंच अधिक केलें आहे, असें म्हणणें भाग पडतें.

**इंग्रजी भाषान्तरें**

मेघदूताचें पहिलें इंग्रजी भाषान्तर डॉ. ए. एच. विल्सन यांनीं १८३३ मध्यें कलकत्यास छापलें. त्यानंतर या काव्याचीं भाषान्तरें युरोपच्या बहुतेक अभिजात भाषांत झालीं आहेत. अगदीं अलिकडचें इंग्रजी भाषान्तर प्रो. जी. एच. रूक

यांचें आहे. त्याशिवाय दरम्यान जेनसन, मॅक्स म्युलर, क्लार्क, जेकब वगैरे अनेक प्रसिद्ध विद्वानांनीं या काव्याच्या भाषान्तराचे प्रयत्न केले आहेत. अर्थातच, या काव्याचा कीर्तिपटह युरोप व अमेरिका या देशांत बराच काळ दुमदुमून राहिला आहे.

**भाषान्तरकाराचें ध्येय.**

एका विस्तृत व प्रमाणबद्ध दालनांतील, कुशलतेनें रचून ठेविलेलें मौल्यवान सामान, त्यास धक्का न लावतां उचलून, दुसऱ्या संकुचित व अडचणीच्या जागेंत तितक्याच कुशलतेनें रचून ठवणें जितकें अवघड आहे, त्यापेक्षां अनेकपट, संस्कृत भाषेंतील एका अप्रतिम काव्याचें मराठींत यथायोग्य भाषान्तर करणें अवघड आहे. पहिल्या जागेंतील सर्व सामान तेथून उचलून दुसऱ्या ठिकाणीं अस्ताव्यस्त कोंबून ठेवणें एखाद्या मजुरासही कष्टसाध्य आहे. पण रचनासौंदर्य, सदभिरुचि, व प्रचलित आवड यांस पूर्ण पोषक होऊन पूर्व स्थलाची शोभा बहुतांशीं प्रतिबिंबित करील, अशी रचना, गैरसोयीच्या व लहान जागेंतही करणें, हें तज्ज्ञ कलावन्ताचेंच काम आहे. पहिला, सामानाचा प्रत्येक नग न चुकतां प्रामाणिकपणें समाविष्ट करील; तर दुसरा, सुंदर व अभिजात मांडणी करतांना तिला विसंगत अगर विघातक अशा किरकोळ जिनसा जरूर पडल्यास फेंकून देण्यासही कमी करणार नाहीं. तसेंच, मुळांतील प्रसाद, कल्पनावैभव व नादमाधुर्य हें भाषान्तरित ग्रंथांत यथाशक्य संक्रमित करण्यांतच भाषान्तरकाराची खरी करामत व वैशिष्ट्य आहे. निव्वळ एका श्लोकांतील कल्पना दुसऱ्यांत कोंबून भरण्यानें भाषान्तराचें कार्य पूर्ण होत नसतें; तर, मूळ श्लोक वाचतांनां रसिकांस जो शुद्ध काव्यानन्दाचा लाभ होतो, व ज्या नादमाधुर्यानें ते डोलूं लागतात, तो काव्यानंद व तें नादमाधुर्य बहुतांशीं भाषान्तरित श्लोकांत उतरविणें हेंच भाषान्तकाराचें ध्येय असलें पाहिजे. या दृष्टीनें या नितांतसुंदर काव्याचीं भाषान्तरें किंवा रूपान्तरें कितीही झालीं, तरी कोणत्याही भाषेस त्यांचा बोजा होणें शक्य नाहीं.

मी हें भाषान्तर हातीं घेण्यास दुसरेंहि एक कारण झालें. मेघदूत काव्याचा व माझा प्रथम परिचय मी प्रवेशपरिक्षेची तयारी करीत असतांना झाला. तेव्हांपासून आजतागायत या ग्रंथाच्या परिशीलनानें निस्सीम काव्यानंदाचे अनेक क्षण मला लाभले. कालिदासाच्या इतर प्रबन्धांत माझ्या आवडीचीं स्थळें अनेक आहेत, पण मेघदूत काव्यांत अशी एकही ओळ नाहीं कीं जिनें मला "प्रतिक्षणं यो नवतामुपैति" अशा आनंदाची प्रतीति अनेकदां दिली नाहीं. अतएव, या माझ्या अत्यंत आवडत्या काव्याचें शक्य तेवढें स्पष्ट प्रतिबिंब मातृभाषेंत उतरवून अंशतः तरी त्याच्या ऋणांतून मुक्त होण्याचा प्रयत्न करणें स्वाभाविकच होतें.

**प्रचलित साहित्याभिरुचि**

अशा जातीच्या वाङ्मयप्रयत्नास साधारण लोकसमाजाचा पाठिंबा मिळणें दुर्घट आहे. मेघदूतासारखें कठीण काव्य काळजी-पूर्वक, रसिकतेच्या जिव्हाळ्यानें वाचणारे, सुशिक्षित म्हणविणाऱ्या लोकांतही फारच थोडे सांपडतील. विद्यार्थीदशेंत अपरिहार्य म्हणून संस्कृत वाङ्मयाचा परिचय कांहीं विश्वविद्यालयाच्या पदवीधरांस घडला, तरी परीक्षकांच्या कचाट्यांतून सुटल्यावर या समृद्ध व सुंदर भाषेची ओळख कायमची विसरणारे शेंकडा नव्वद तरी सांपडतील. एकतर, संस्कृत ही सध्यांच्या काळीं इंग्रजीप्रमाणें "अर्थकरी" विद्या नाहीं. तेव्हां "मृतभाषा" म्हणून कांहीं विद्वान् तिचा उघड उपहास करितात. मराठी भाषेची स्थिति त्याहूनही वाईट आहे. वर्तमानपत्रें, सटरफटर लघुकथा (बहुशः इंग्रजी किंवा बंगाली लघुकथांचीं भाषांतरें किंवा रूपांतरें); प्रचलित विषयांवरील किरकोळ लेखांनीं भरलेलीं मासिकें, साप्ताहिकें किंवा इतर नियतकालिकें; पर्ज्यन्योद्भवा-नंतर जन्मून कांहीं दिवसांनीं विलय पावणाऱ्या कीटकांप्रमाणें भराभर बाहेर पडणाऱ्या, बहुशः प्रेमविषयक किंवा नवमतवादविवेचक कादंबऱ्या; व अस्सल टारगटपणा हाच विनोद असें समजणाऱ्या, व स्वतः शॉ, इब्सेन, किंवा ऑस्कर वाइल्ड आहोंत अशा भ्रमांत असलेल्या नाट्यकारांच्या अल्पजीवी-

कृती, या पलिकडे मराठी भाषेची धांव क्वचितच जाते. क्वचित्प्रसंगीं रा. दामोदरपंत यंद्यांच्या ग्रंथसंपादक व ग्रंथप्रसारक मंडळीसारखी एखादी दुसरी संस्था, सहाराच्या रेताड मैदानांतील हिरवळीप्रमाणें, कांहीं सुंदर व प्रौढ साहित्त्यात्मक ग्रंथ प्रकाशित करून, मराठी भाषेच्या जिवंतपणाची प्रतीति करून देते. जुन्या पिढींत, ज्ञानेश्वर, वामन पंडित, मोरोपंत, मुक्तेश्वर, महीपती, तुकाराम, रामदास, इत्यादिकांचे ग्रंथ आवडीनें अगर भक्तीनें वाचणारे लोक शेंकड्यांनीं आढळत. या पिढींत शेंकडा एखादा तरी सांपडेल कीं नाहीं ही शंकाच आहे. अशा स्थितींत भारदस्त व विचारपरिपोषक ग्रंथ कुणी मराठींत लिहिण्याचें धाडस केल्यास, त्याची छापणावळही लेखकाच्या आंगावर पडून, पुस्तकेंही बहुधा धूळ खात पडतात, असाच सामान्य अनुभव आहे. अशाही विषम परिस्थितींत, निरपेक्षबुद्धीनें व निव्वळ साहित्य-प्रेमानें, मराठी भाषेची सेवा कांहीं थोडे साहित्त्यिक करीत आहेत हें सुचिन्ह होय.

**मेघदूताचें संविधानक**

शापामुळें आपल्या तरुण, रूपवती भार्येपासून निरूपायास्तव दुरावलेला एक विलासी यक्ष, अनन्यगतिक, किंकर्तव्यतामूढ, अतएव भ्रांतचित्त होत्साता, आपला क्षेमसंदेश आपल्या प्रियतमेकडे पोहोंचविण्याची याचना, मेघरूपी दूताकडे करितो, या साध्या कल्पनेवर या हृदयंगम काव्याची उभारणी केलेली आहे. याचे पूर्वमेघ व उत्तरमेघ असे दोन विभाग आहेत. पहिल्या बारा श्लोकांत संविधानकाची प्रस्तावना केली आहे. तेराव्यापासून त्रेसष्टाव्या श्लोकापर्यंत, रामगिरीपासून अल्का नगरापर्यंतच्या मार्गाचें वर्णन केलें आहें. येथें पूर्वमेघ संपतो. उत्तरमेघाच्या पहिल्या अकरा श्लोकांत अल्कावर्तीचें वर्णन आहे. बाराव्यापासून सतराव्या श्लोकापर्यंत यक्ष आपल्या घराच्या खाणाखुणा सांगतो; अठराव्यापासून पस्तीसाव्यापर्यंत यक्षपत्नीचें वर्णन आहे; व त्यापुढें यक्षसंदेश आहे; असे या काव्याचे ढोबळ रीतीनें रचनाविभाग करितां येतील.

" कामार्ता हि प्रकृतिकृपणाश्चेतनाचेतनेषु ॥ " अशी आगाऊ कैफियत देऊन असंभाव्यतादोषापासून कवीनें आपली सुटका करून घेतली आहे शिवाय कविसंप्रदायाच्याही दृष्टीनें मेघदूताची मूळ कल्पना, संस्कृत वाङ्मयाच्या वाचकांस अपरिचित नाहीं. विक्रमोर्वशीय नाटकाच्या चवथ्या अंकांत विरही पुरुरवा, मोर, कोकीळ, राजहंस, हत्ती, हरिण, पर्वत,—जें कांहीं सचेतन किंवा अचेतन दृग्गोचर होईल—त्याच्याशीं उर्वशीबद्दल चौकशी करीत सुटला आहे. " कथं नु तं बन्धुरकोमलांगुलिं । करं विहायासि निमग्नमम्भसि ॥ " म्हणून दुष्यंत आंगठीची निर्भर्त्सना करितो. मालतीमाधवाच्या सातव्या अंकांत मेघदूतांतील बीजकल्पनेचा अनुवाद तर स्पष्टच आढळतो. इतर अभिजात काव्यवाङ्मयाकडेही दृष्टि फेंकल्यास, विरही जनांच्या विप्रलंभशृंगारात्मक चेष्टा कांहींशा अशाच वळणावर गेल्याचें आढळून येईल.

यक्ष आणि यक्षपत्नी हीं या संविधानकविरहित काव्याचीं नायक व नायिका म्हणण्यास हरकत नाहीं. कुबेराच्या शापामुळें पदच्युत होऊन निर्वासित झालेला यक्ष, सहजच आपल्या प्रियपत्नीच्या सहवासास मुकतो. तो तरुण, कामुक, व पत्नीच्या ठिकाणीं अत्यंत आसक्त असल्यामुळें वर्षावधीचा विरह त्यास असह्य होतो; व त्यामुळें शरीरानें दुर्बल व भ्रांतचित्त होऊन, तो मेघाकरवीं पत्नीस निरोप पाठविण्याचा हास्यास्पद प्रयत्न करितो.

हा यक्ष सहजस्थितींत कामचारी, म्हणजे इच्छागमनी असल्यामुळें त्याचें भूगोलविषयक ज्ञान सूक्ष्म व सविस्तर आहे; म्हणून तो रामगिरीपासून अलकेपर्यंतच्या रस्त्याचें, खाणाखुणांसकट मार्मिक वर्णन करूं शकतो. तो रसिक व मायाळु असून तत्वज्ञही आहे; व त्यामुळें तो " कस्यात्यन्तं सुखमुपनतं दुःखमेकान्ततो वा, " " स्नेहानाहुः किमपि विरहे ध्वंसिनस्ते त्वभोगात् । इष्टे वस्तुन्युपचितरसाः प्रेमराशीभवन्ति ॥ " इत्यादि अनेक सुंदर व विश्वगामी तत्त्वविचार प्रकट करतो. तसेंच, आहे त्या स्थितींत समाधान मानून, आगामी शुभकालाची धैर्यानें वाट पाहण्यांत त्याचा समंजसपणा दिसून येतो. विप्रलंभ-

विरही नायक या दृष्टीनें हा इतर गोष्टींत ठराविक सांच्यांतील असल्यामुळें, त्याच्याविषयीं जास्त लिहिणें नको.

यक्षपत्नीच्या स्वभाववर्णनांत विशेष वैशिष्टच दिसत नाहीं. ती सुंदर असून पतिव्रता आहे. प्रोषितभर्तृकांच्या नेहमीच्या परिपाठाप्रमाणें " वसने परिधूसरे वसाना । नियमक्षाममुखी धृतैकवेणिः ॥" अशा तऱ्हेची ती आहे; व शृंगारशास्त्रांत वर्णिलेलीं विरहिणीचीं सर्व चिन्हें तिच्या ठिकाणीं दृग्गोचर होतात.

या काव्यांतील प्रवासविप्रलंभशृंगाराचा उगम विवाहित प्रणयी युग्मापासून झाला आहे. शाकुंतल, मालविकाग्निमित्र नाटकांतील नायक–नायिका विवाहेच्छु असली, तरी संविधानकाच्या बहुतेक अवधींत तीं विवाहबद्ध होत नाहींत. विक्रमोर्वशीय नाटकांतील नायिका जात्याच अप्सरा असल्यामुळें तिला वैवाहिक बंधनाची जरूरच भासत नाहीं. अलिकडच्या भाषेंत बोलावयाचें, म्हणजे ती पूर्ण " नवमतवादी " आहे.

**मेघाची दौत्य-विषयक योग्यता**

कुलीन स्त्रियांकडे निरोप पाठविण्यास लायक असा दूत विशिष्टगुणसंपन्नच असला पाहिजे. " ब्रह्मचारी बली धीरो मायावी मानवर्जितः । भीमानुदारो निःशंको वक्ता दूतः स्त्रियां भवेत् ॥. " या काव्यांत मेघ बहुधा अशाच स्वरूपाचा रंगविला आहे. संतप्तांचा सखा, प्रोषितभर्तृकांचें आशास्थान, पर्वतांचा परममित्र, विशालकुलसंभव अतएव शीलवान्, व्यर्थ बडबड न करितां याचकांची गरज पुरविणारा, कामरूप, कामचारी, कृषीवलांचा आधार, आर्द्रांतरात्मा अतएव करुणावृत्ति, असा हा मेघ आहे. तो श्रद्धावान शंकरभक्तही आहे. महाकालेश्वराच्या संध्याकालीन पूजेच्या वेळीं तो मुद्दाम त्या ठिकाणीं थांबून पटहध्वनीचें काम उरकतो; संध्यारागांनीं रंजित होत्साता गजचर्माचा आभास उत्पन्न करून शंकराचें रंजन करण्याचा यत्न करितो; कार्तिकेयाच्या मोरास आपल्या गडगडाटानें नाचवितो, व हिमालयांतील शिवचरणन्यास ( हरकी पायरी ) लागतांच भक्तिभावानें त्याला

प्रदक्षिणा घालण्यासही चुकत नाहीं. पण हा मेघ ब्रह्मचारी नसून विलासी व स्त्रीदाक्षिण्ययुक्त आहे. ' विद्युत् ' ही त्याची सहचारिणी असून, नद्या त्याच्या अनेक प्रणयिनी आहेत. उज्जयिनीच्या पौरांगनांच्या लोलापांगांनीं तो आकर्षिला जातो. दशपुरवधूनेत्रकौतूहलांचा स्वतः विषय व्हावें ही कामिजनसहज आकांक्षा त्यास आहे. तसेंच, वारा हा वाटाड्या बरोबर घेऊन सौधाग्रभूमीवर जाऊन तेथील चित्रें बाष्पतुषारांनीं दूषित करणाऱ्या मेघांच्या जातीचाच हा आहे. वेळप्रसंगीं, धैर्य व चातुर्यही हा प्रकट करतो. उदाहरणार्थ, शरभांनीं वाट सोडून आंगावर उडी मारण्याचा यत्न केल्यास, गारांची वृष्टी करून, तो त्यांची दाणादाण करतो; व सुरस्त्रियांनीं उन्हाळ्यांत त्याला धारायंत्र बनविण्याचा यत्न केल्यास, भयंकर गर्जना करून आपली सुटका करून घेतो. मेघाची विलासी वृत्ति माहीत असल्यामुळें दूरदर्शी व सावध यक्ष आपल्या भार्येशीं त्याचें भावजयीचें नातें जोडून कांहींसा निश्चिंत होतो, व आपली बायको साध्वी असल्याचें त्यास अनेक वेळां बजावतो. विलासी वृत्ति हा एक दोष क्षणभर डोळ्याआड केल्यास, हा मेघ, दूत होण्यास सर्वथैव लायक होतासें दिसतें. शिवाय, याचा खडा आवाज वक्तृत्वास पोषकच आहे, हेंही विसरून चालणार नाहीं.

**कालिदासाचें निसर्गावरील अपार प्रेम, व त्याची सूक्ष्म निरीक्षणशक्ति.**

कालिदास आंग्लकवि वर्डस्वर्थप्रमाणें निसर्गाशीं समरस होऊन, ऋतुमानाप्रमाणें होणाऱ्या सृष्टींतील फेरफारांचें मार्मिक व सुंदर शब्दचित्र रंगवूं शकतो, हें प्रसिद्धच आहे. मेघदूतांत वर्षाकालोद्भवजन्य निसर्गाचें रम्य स्वरूप वर्णन करण्यांत त्यानें कमालीचें कौशल्य प्रकट केलें आहे. "उपशान्तमन्मथ" निदाघकाल संपल्यावर, मेघराज आपल्या विपुल व सर्वगामी वृष्टीनें अखिल सृष्टीस नवचैतन्य देतो, व पृथ्वीवर नवतृणांकुरांचें व तत्कालोद्भव वनस्पतींचें आस्तरण उत्पन्न करितो. "तपति प्रावृषि नितरामभ्यर्णजलागमो दिवसः" या न्यायानें पर्जन्यवृष्टीपूर्वीं कांहीं दिवस होत असलेल्या

असह्य उकाड्याच्या त्रासांतून प्राणिमात्र एकदम मुक्त झाल्यामुळें, चित्तवृत्ती उल्हसित होऊन कामोद्दीपन होणें क्रमप्राप्तच आहे. यावेळीं प्रियसमागमांत सुखी असलेल्या लोकांच्याही वृत्ती चंचल व विलासलोलुप होतात; तेव्हां प्रवासामुळें, किंवा अन्य कारणांनीं (प्रस्तुत काव्यांत, शापामुळें) प्रियजनांपासून दुरावलेल्यांची स्थिति करुणास्पद होणें साहजिकच आहे. वर्षाकालोद्भव व मन्मथोद्दीपन यांचा निकट संबंध संस्कृत काव्यांत अनेक वेळां दृग्गोचर होतो. जयदेवकवीनें यमुनातीरावर राधामाधवांच्या रहःकेली गाण्यासाठीं " मेघैर्मेदुरमम्बरं वनभुवः श्यामाः तमालद्रुमैः " एवंगुणविशिष्ट कालाचीच निवड केली आहे. विशाखदत्तानें चारुदत्तवसंतसेनेच्या प्रथम समागमासाठीं " फुल्लकदंबनीपसुरभिर्घनोद्भासितकाल " च पसंत केला. विरही पुरुरव्याला, " नववारिधरोदयादहोभिर्भवितव्यं हि निरातपर्द्धिरम्यैः " ही कल्पना देखील उर्वशीच्या विरहामुळें भयंकर वाटली. उत्तररामचरितांत चित्रदर्शनाच्या वेळीं लक्ष्मणानें माल्यवान पर्वतावर नवमेघोदय झाल्याचें दाखवितांच, रामाची पूर्वविरहस्मृति जागृत होऊन, त्यानें पुढील चित्ररचना पाहण्याचें नाकारलें. तेव्हां नवमेघोदय व विरही यक्षाचा चित्तविभ्रम यांचा कार्यकारणसंबंध पूर्वरूढ कविसंप्रदायाशीं सुसंगतच आहे. मेघांचा गडगडाट ऐकतांच वाटेंत रेंगाळत असलेले प्रवासी आपापलीं गांठोडीं काखोटीस मारून प्रिय भार्यांच्या गुंतलेल्या वेण्या सोडविण्यासाठीं धांवत सुटतात, ही कल्पना मोठी रम्य आहे.

बगळ्यांची गर्भधारणा अभ्रदर्शनानें होते, असा उल्लेख पूर्वमेघाच्या ९ व्या श्लोकांत आला आहे. इतर पाखरांच्या कांहीं जातीप्रमाणें बगळेही पावसाळ्याच्या सुरवातीस प्रजोत्पत्ति करीत असतील, या पलीकडे या कल्पनेला दुसरा आधार दिसत नाहीं. पावसाच्या पहिल्या एकदोन सरी पडल्यावर उन्हाळ्यानें तापलेल्या जमिनींतून—विशेषतः ती नांगरली जात असतां,—एक अत्यंत मधुर वास दरवळतो; त्याची यथार्थ कल्पना, सर्व आयुष्य शहरांत घालविलेल्या मनुष्यास होणें शक्य नाहीं. या सुवासाचा उल्लेख मेघदूतांत

अनेक वेळां आला आहे. ( पूर्वमेघ श्लो. १६; ४२ ). पाणथळ जागीं देवकेळी उगवून त्यांस फुलें येणें (पू. मे. श्लो. २१); छत्रीच्या आकाराची लहानमोठीं फुलें, ज्यांस संस्कृतांत "शिलींध्रक" म्हणतात, व ज्यांस कोंकणांत "शृंगार" (शिणगार) किंवा "अळमी" म्हणतात तीं जमिनींतून वर येणें ( पू. मे. श्लो. ११ ); सोनकेवड्याचे फड उगवून त्यांचा चहूंकडे घमघमाट पसरणें ( पू. मे. श्लो. २३ ); रान आंब्यांचे पाड पिकून, त्यांनीं डोंगरांच्या कडा पिवळ्याजर्द दिसणें ( पू. मे. श्लो. १८ ); कदंबवृक्षांस फुलांचा बहर येणें (पू. मे. श्लो. २१ व २५); जांभळीचीं झाडें पिकलेल्या फळांनीं डंवरून गेल्यामुळें, कांहीं रानवटींस जांभळा रंग येणें ( पू. मे. श्लो. २३ ); पावसाळी वाऱ्यामुळें उंबराचीं फळें पक्व होणें, व कुड्याच्या झाडांना फुलें येणें (पू. मे. श्लो. ४, २२ व ४२ ); नद्यांचीं पुलिनें झाडांच्या पिकलेल्या पानांनीं भरून जाणें (पू. मे. श्लो. २९); वगैरे वर्षाकालारंभींचे सृष्टिचमत्कार कालिदासानें आपल्या अद्वितीय वाग्वैभवानें या काव्यांत वर्णिले आहेत.

पावसाचा आणि चातकांचा संबंध संस्कृत काव्यांत परिचितच आहे. ( पू. मे. श्लो. ९ व उ. मे. श्लो. ५१ ); मेघांच्या दर्शनानें मोर टाहो फोडून नाचूं लागतात ( पू. मे. श्लो. २२,३२, व ४४ ); राजहंस मानससरोवराकडे निघून जातात ( पू. मे. श्लो. ११; उ. मे. श्लो. १३ ); कावळे वडापिंपळांच्या झाडांवर घरटीं बांधूं लागतात ( पू. मे. श्लो. २३ ); तसेंच, इन्द्रधनुष्याच्या सुरम्य देखाव्याचा ( पू. मे. श्लो. १५ व उ. मे. श्लो. १ ) व असेच इतर अनेक उल्लेख व वर्णनें, यांनीं या काव्यास अवर्णनीय शोभा आली आहे.

**पौराणिक व ऐतिहासिक उल्लेख**

तसेंच मेघदूतांत रामायण, महाभारत, पुराणें, व इतर प्राचीन ग्रंथांतील व्यक्तींचा व कथांचा उल्लेख आहे. रामगिरी ( चित्रकूट ) पर्वतांवर श्रीरामचंद्राची वस्ती (पू. मे. श्लो. १ व १२); निचुल व दिङ्नाग; या विद्वान साहित्यिकांचा ओझरता नामनिर्देश ( पू. मे. श्लो. १४; या उल्लेखाबद्दल तीव्र

मतभेद आहे ); कथासरित्सागरांतील वत्सराज उदयनाची कथा ( पू. मे. श्लो. ३० ); गजासुराचा वध, व त्यास मारल्यावर त्याचें ओलें चामडें हातांवर घेऊन शंकरानें केलेलें तांडवनृत्य (पू. मे. श्लो. ३६); कुमारजन्माची कथा ( पू. मे. श्लो. ४३ ); रंतिदेव नांवाच्या दशपूरच्या राजानें गोयज्ञानिमित्त हजारों गाई मारल्यामुळें, त्यांच्या ओल्या चामड्यांतून निथळणाऱ्या रक्तामुळें चर्मण्वती ( चंबळा ) नदीची उत्पत्ति ( पू. मे. श्लो. ४५ ); कुरुक्षेत्रावरील भारतीय युद्ध व अर्जुनाचा पराक्रम ( पू. मे. श्लो. ४८); भारतीय युद्धाचे वेळीं कोणत्याही पक्षास न मिळतां, बळरामाचें सरस्वती नदीच्या तीरावर तपश्चर्येस जाणें; (पू. मे. श्लो.४९), गंगावतरणाची कथा ( पू. मे. श्लो. ५० ); क्रौंचरन्ध्राची उत्पत्ति ( पू. मे. श्लो. ५७ ); वामनावतारीं बलिनियमन ( पू. मे. श्लो. ५७ ); कैलास पर्वत उचलण्याचा रावणानें केलेला प्रयत्न ( पू. मे. श्लो. ५८ ); सीतेच्या शोधार्थ मारुतीचें अशोकवनांत जाणें ( उ. मे. श्लो. ३७ ); वगैरे उल्लेखित कथांचे संदर्भ नीट न समजल्यास रसहानि होण्याचा संभव आहे, म्हणून विवक्षित श्लोकांच्या खालीं जरूर वाटल्या तेथें टीपा देऊन, त्यांचे थोडक्यांत विवरण करण्याचा यत्न केला आहे.

**शुभशकुनांचा उल्लेख.**

आगामी शुभाशुभ घटनांचीं सूचक चिन्हें व शकुन यांचा या काव्यांतला निर्देशही वाचकांस उद्बोधक होईल; प्रवासास निघाल्या वेळीं अनुकूल वारा, डावीकडे चातकांचा शब्द, बलाकादर्शन ( पू. मे. श्लो. ९ ); बायकांचा डावा डोळा व डावी मांडी स्फुरण पावणें ( उ. मे. श्लो. ३२ व ३३ ) हे शुभ शकुन समजले जात असत.

**दूतमार्ग.**

यक्षानें रामगिरीपासून अलकेपर्यंत वर्णिलेल्या रस्त्याचा ढोबळ नकाशा भाषान्तराच्या सुरवातीस दिला आहे. उल्लेखित स्थळांपैकीं कांहीं त्यांच्या प्रचलित नांवानीं संबोधिलीं आहेत. कांहीं स्थलांच्या बाबतींत त्यांचीं सध्यांचीं

नांवें, व हिंदुस्थान देशाच्या नकाशांतील विशिष्ट स्थानें आज शेंकडों वर्षानंतर बिनचुक सांगणें शक्य नाहीं. अशा वादग्रस्त स्थलांबद्दल ज्या शिष्टसंमत कल्पना आहेत, त्या श्लोकांखालीं दिलेल्या टीपांत नमूद केल्या आहेत. या भौगोलिक विषयाचा कुणी विद्वानानें विशेष व्यासंग केल्यास बरीच महत्वाची माहिती उपलब्ध होण्याचा संभव आहे.

**मेघदूतांतील अलंकार.**

कालिदासाच्या इतर काव्याप्रमाणें मेघदूतांतही अत्यंत सुंदर व यथोचित अलंकारांची रेलचेल आहे. उपमा, उत्प्रेक्षा, अर्थान्तरन्यास, भ्रान्तिमत्, विषम, विरोधाभास, व्यतिरेक, उदात्त, वगैरे अलंकारांनीं या काव्यास जागोजागीं अवर्णनीय सौंदर्य प्राप्त झालें आहे. विशेषतः उपमालंकाराची अनेक अप्रतिम उदाहरणें कवीच्या प्रसिद्ध उपमाकौशल्यास साजेशींच आहेत. त्यांतील कांहींचा खाली उल्लेख केला आहे:—

इन्द्रधनुष्याच्या सान्निध्यानें मेघ, आणि मयुरपिच्छांनीं विभूषित गोपवेषधारी श्रीकृष्ण यांचे साम्यनिदर्शन ( पू. मे. श्लो. १५ ); आम्रकूट पर्वताच्या चौफेर, पिकलेल्या आम्रफलांनीं ओथंबिलेल्या आंबराई, व त्याच्या शिखरावर उपस्थित असलेला कृष्णमेघ या देखाव्यास, भूदेवीच्या स्तनाची उपमा ( पू. मे. श्लो. १८ ); गंगानदीच्या शुभ्रवर्ण प्रवाहावर श्यामवर्ण मेघ उदकग्रहणार्थ खालीं वांकून पुढें चालूं लागतांच, भलत्याच स्थलीं गंगायमुनासंगमाचा आभास ( पू. मे. श्लो. ५१ ); जिच्या बाजूनें गंगेचा प्रवाह वांकडींतिकडीं वळणें घेऊन जात आहे, व जिच्या गगनभेदी प्रासादांवर वर्षाकालोद्भव मेघमाला मोत्यांच्या दाण्यांप्रमाणें जलबिंदूंचा वर्षाव करीत आहे, अशा कैलासपर्वताच्या उतरणीवर वसलेल्या अलकानगरीस, आंगावरील पदर अव्यवस्थितपणें दूर सारून, प्रियकराच्या अंकावर निःशंकपणें व लीलेनें रेललेल्या, व केशकलापांवर मोत्यांची जाळी ल्यालेल्या विलासिनीची उपमा ( पू. मे. श्लो. ६३ ); स्वर्गलोकीं वास करणाऱ्या पुण्यात्म्यांनीं "क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति" या न्यायानें पुण्य कमी होऊन पृथ्वीवर परत

फिरण्याचा वेळ जवळ येतांच, राहिलेलें पुण्य एकवटून, त्याच्या मोबदल्यांत पृथ्वीवर आणिलेला स्वर्गाचा भाग, असें उज्जयिनीचें, त्या शहरावर अपार प्रेम दाखविणारें वर्णन (पू. मे. श्लो. ३०); उत्तुङ्ग प्रासादांच्या अग्रभागांवर वाऱ्यानें आणिलेल्या, व तेथील चित्रें बाष्पसेकानें मलीन करणाऱ्या मेघांस, परस्त्र्यांच्या घरांत शिरून कुमारिकांना दूषित करणाऱ्या वाममार्गी पुरुषांची उपमा ( उ. मे. श्लो. ६ ); अलकावतीचे गगनचुंबी प्रासाद व मेघ यांची तुलनात्मक पूर्णोपमा ( उ. मे. श्लो. १ ); रडून रडून सुजलेले डोळे, सतत उष्णश्वास सोडून काळवंडलेले ओंठ, व बरेच दिवस केशसंस्कार न केल्यामुळें तोंडावर इतस्ततः विखुरलेले केंस, अशा चिन्हांनीं युक्त असलेल्या यक्षपत्नीच्या मुखास, मेघांनीं व्यापिलेल्या लुप्ततेज चंद्राची उपमा ( उ मे. श्लो. २१ ); हीं उपमालंकाराचीं कांहीं ठळक उदाहरणें आहेत.

उपमालंकाराच्या खालोखाल या काव्यांतील अर्थान्तरन्यासाचे नमुने, नित्य परिचयाच्या व्यवहारसूत्रांचें वैभव व प्रसिद्धि पावण्यालायक व उठावदार साधले आहेत. त्यांतील कांहींचा निर्देश केल्याशिवाय राहवत नाहीं:—

(१) याञ्चा मोघा वरमधिगुणे नाधमे लब्धकामा। (पू. मे. श्लो. ६).
(२) रिक्तः सर्वो भवति हि लघुः पूर्णता गौरवाय। (पू. मे. श्लो. २०).
(३) स्त्रीणामाद्यं प्रणयवचनं विभ्रमो हि प्रियेषु। (पू. मे. श्लो. २८ )*
(४) आपन्नार्तिप्रशमनफलाः संपदो ह्युत्तमानाम्। ( पू. मे. श्लो. ५३ ).
(५) कस्यात्यन्तं सुखमुपनतं दुःखमेकान्ततो वा।
नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण॥ (उ. मे. श्लो. ४६)+
(६) प्रत्युक्तं हि प्रणयिषु सतामीप्सितार्थक्रियैव। (उ. मे. श्लो. ५१).

---

* स्त्रिया, लीलाविभ्रमांनीं ( शब्दांनीं नव्हे ) प्रियकरास आपलें मनोगत कळवितात, हा देशकालातिवर्ति सिद्धान्त कालिदासासारख्या कामतंत्रनिपुण प्रतिभाशाली कवीनें आपल्या अद्वितीय शब्दसंपत्तीनें सजविला आहे.

+ यक्षसंदेशाचें हें सार असून, कोणाही संसारी माणसास सदैव हृदयांत बाळगण्याजोगा हा महामंत्र आहे.

उत्तरमेघांतील ५ वा श्लोक हा 'भ्रांतिमत्' अलंकाराचें एक सर्वोत्कृष्ट उदाहरण आहे. आंगावरील वस्त्र, निरीची गांठ सुटल्यावर प्रियकरांनीं एकदम हिसकावून दूर उडवून दिल्यामुळें, लाजेनें बेभान झालेल्या तरुणींच्या दृष्टीला, उजेड देणारीं रत्नें हे दिवेच आहेत अशी क्षणमात्र भ्रांती झाली; त्यामुळें त्यांनीं मुठींना बुका उधळून त्यांना ( रत्नांना ) विझविण्याचा निष्फळ यत्न केला. रत्नसमृद्धीचा उल्लेख करून, यक्षांच्य वैभवाचा गौरव करण्याचा कवीचा इरादा असल्यामुळें, या श्लोकांत 'उदात्त' अलंकारही समाविला आहे. उत्तरमेघांतील ४० सावा श्लोकही विरोधाभासाचें एक मनोरम उदाहरण आहे. तुरळक अवतरणें देऊन या काव्यांतील अलंकार-समृद्धीची यथार्थ कल्पना होणें शक्य नाहीं. तें समग्रच वाचणें आवश्यक आहे.

**तत्कालीन चालीरीती**

प्रवासाचीं साधनें अत्यंत मंदगामी व अपर्याप्त असल्यामुळें, प्रवासास गेलेला मनुष्य लवकर परत येणें शक्य नव्हतें; म्हणून प्रोषितभर्तृकांचा ( अथवा पथिकवनितांचा ) कार्यक्रम बराचसा विधवांच्या वळणार आंखलेला दिसतो.

**" क्रीडां शरीरसंस्कारं समाजोत्सवदर्शनम् ।**
**" हास्यं परगृहे यानं त्यजेत् प्रोषितभर्तृका ॥ "**

याज्ञवल्क्यस्मृति अ. १ श्लो. ८४

केशसंस्कार वर्ज्य, पतिवियोगानंतर एकदांच केंस कसे तरी बांधून टाकायचे, व नंतर जटा झाल्या तरी तिकडे लक्ष द्यावयाचें नाहीं, तसेंच, डोळ्यांत काजळ न घालणें, मद्यास न शिवणें, जमिनीवर झोंपणें, अलंकारांचा व पुष्पमालांचा त्याग करणें, वगैरे कठीण नियम प्रोषितभर्तृकांस पाळावे लागत असत. नवरा परत आल्यावर तो विरही पत्नीची वेणी सोडून, तेल लावून पुन्हा बांधीत असे.

अलकावती, व उज्जयिनी, या शहरांची, विशेषतः तेथील पौरजनांच्या विलासांचीं वर्णनें वाचून हा काल सुबत्तेचा, व शांततेचा, अतएव भोगवृत्तीस

पोषक होता, असा निष्कर्ष काढण्यास हरकत नाहीं. कालिदासाच्या कालीं, मधुपान ( मद्यासक्ति ) हा एक उपभोगाचा शिष्टसंमत प्रकार दिसतो. उच्चकुलीन बायकांना सुद्धां दारू निषिद्ध नव्हती याचा स्पष्ट पुरावा कालिदासाच्या व इतर तत्कालीन ग्रंथांत सांपडतो. मालविकाग्निमित्र नाटकांत तर इरावती राणीनें कमालच केली आहे. ती तिसऱ्या अंकाच्या एका प्रवेशांत मद्यानें झिंगलेली प्रवेश करते. " न मे चरणावन्यतः प्रवर्तेते । मदो मां विकारयति "[1] अशी स्वतःच कबुली देऊन, दासीला विचारते कीं:— "निपुणिके, शृणोमि बहुशः मदः किल स्त्रीजनस्य विशेषमन्डनामिति, अपि सत्य एष लोकप्रवादः ? "[2]; आणि नवऱ्यावर हात टाकल्यावर, " रशनासंधारित-चरणा व्रजति "[3] ! ! ही प्रत्यक्ष राणीची अवस्था; मग इतरेजनांची गोष्टच बोलणें नको. ऋतुसंहारांत, कामीजन " प्रियामुखोश्वासविकंपितं मधु " पीत असल्याचा उल्लेख आहे. कुमारसंभवाच्या आठव्या सर्गात गंधमादनवनाधिदेवता प्रत्यक्ष पार्वतीमहेशांस कल्पवृक्षमधु आणून देतात; व स्वतः शंकर " सेव्यतामिदमनंगदीपनम् ", म्हणून अंबिकेला तो पाजतात " असति त्वयि वारुणीमदः प्रमदानामधुना विडंबना " म्हणून रती मदनदहनानंतर विलाप करिते. मेघदूतांत मद्यपानाचा उल्लेख अनेकदां आला आहे ( उ. मे. श्लो. ३, ११ व ३२ ). शहरांतून संगीताचाही प्रसार घरोघरीं असल्याचें दिसून येतें ( उ. मे. श्लो. १ व २ ). फुरसतीच्या वेळीं, हौशी लोक सुंदर स्त्रियांसमवेत उद्यानांत जाऊन गाणें बजावणें व इतर शौक पुरे करीत असत ( उ. मे. श्लो. ८ ). श्रीनगर ( काश्मीर ) येथील " शालिमार " वगैरे सुंदर उपवनांत सद्यःकालींही असले

( १ ) माझ्यानें धड चालवत नाहीं. मदिरापानानें मी झिंगल्यासारखी झालें आहे.

( २ ) निपुणिके ! मदिरेच्या कैफामुळें स्त्रीजनांचें सौंदर्य विशेषच खुलून दिसतें असें लोक म्हणतात, तें खरें का ?

( ३ ) कंबरपट्टा निसटून पायांत आल्यामुळें, अडखळत निघून जाते.

ख्यालीखुशालीचे प्रकार सुटीच्या दिवसांत व रात्रौ चालू असलेले आम्ही प्रत्यक्ष पाहिले आहेत. हिंदुस्थान देशाची हवा वर्षांतून कांहीं महिने फार उष्ण असल्यामुळें, जलविहार, धारायंत्रें इत्यादि प्रचारांत असणें साहजिकच होतें. ( पू. मे. श्लो. ३३ व ६१ ). देवळांतून कलावंतिणींचे नाच करण्याची प्रथा तेव्हांही होती. ( पू. मे. श्लो. ३५ ). यज्ञानिमित्त गोवध करणें पुण्यकर्म समजलें जात असे ( पू. मे. श्लो. ४५ ) उत्तररामचरितांत तर " श्रोत्रियायाभ्यागताय वत्सतरीं महोक्षं महाजं वा निर्वपन्ति गृहमेधिनः तद्धि धर्मसूत्रकारः समामनन्ति " म्हणून अतिथिसंतर्पणार्थही गोवध विहित असल्याचा स्पष्टच उल्लेख आहे. वेदांमध्येंही ब-याच जागीं गोवध विहीत मानिला आहे ( ऋग्वेद ६-२८-४ व १०,१९९,३ ). लग्नविधीच्याही वेळीं गोहत्त्या प्रचलित होती ( ऋग्वेद १०-८५-१३ ). सन्मान्य पाहुण्यांना गोमांसाची मेजवानी देण्याचा प्रघात होता ( ऋग्वेद १ ३१-१५; याज्ञ. आचार. श्लो. १०९ ). श्राद्धविधींत गोमांसाचा उपयोग करीत असल्याचा उल्लेख गोभिलगृह्यसूत्रांत आहे. कालान्तरानें इष्टानिष्ट कल्पना व धर्माचार यांत कसा फरक पडत जातो, याचें हें एक ठळक उदाहरण आहे.

**बायकांचे अलंकार व वेषभूषा.** कांची ( पू. मे. श्लो. २८ ); मोत्यांची जाळी ( पू. मे. श्लो. ६३ ); मोत्यांचे सर ( उ. मे. श्लो. ९ ); बारीक मोत्यांची दुंगणाभोंवतीं एकांतांत लपेटण्याची जाळी ( उ. मे. श्लो. ३३ ); इत्यादि दागिन्यांचा मेघदूतांत उल्लेख आहे. फुलांवर स्त्रियांची विशेष भक्ति होती ( उ. मे. श्लो. २ ); सद्यःकालाप्रमाणें तोंडाला पिकडी ( पावडर ) ही स्त्रिया लावीत असत, व ती लोध्रपुष्पांच्या परागांची बनविलेली असे ( उ. मे. श्लो. २ ); तसेंच, केशसंस्कारधूपही प्रचारांत होते ( पू. मे. श्लो. ३२ ); दारासमोर शंखपद्में काढण्याची चाल असे ( उ. मे. श्लो. १७ ).

**काव्याचें वृत्त.** हें काव्य मंदाक्रान्तावृत्तांत लिहिलें आहे. शरत्कालीन नदीच्या ओघा-प्रमाणें या वृत्ताचा प्रवाह समृद्ध, शांत व डौलदार आहे. हें शांत व करूण रसांस विशेष परिपोषक समजतात. " प्रावृट्प्रवासव्यसने मंदाक्रान्ता विराजते ". प्रस्तुत काव्यांत शृंगारही या वृत्तांत उत्कृष्ट रीतीनें सजविला गेला आहे. संस्कृत काव्याचें मराठी भाषान्तर करतांना ज्या विशिष्ट अडचणींस तोंड देणें भाग पडते, त्यांचा उल्लेख आम्ही आमच्या ' महाराष्ट्र रत्नावली'च्या प्रस्तावनेंत केलेला आहे.

संस्कृत भाषेचें समासप्राचुर्य, यमकविमुखता व नादमाधुर्य या गुणांमुळें ती, मराठी अगर दुसऱ्या कोणत्याही तज्जातीय भाषेपेक्षां, काव्यपरिपोषास अत्यंत सोईची आहे. तिचा वाक्प्रचारही मराठीहून निराळा आहे. उदाहरणार्थ, " विद्युत्वन्तं ललितवनिताः " ( उ. मे. श्लो. १ ); " अङ्गेनाङ्गं प्रतनु तनुना " ( उ. मे. श्लो. ३९ ) या श्लोकांचें मराठींत भाषांतर त्याच तऱ्हेनें करूं पाहिल्यास, तें क्लिष्ट व प्रसादहीन होईल. ही गोष्ट थोड्याबहुत प्रमाणानें सर्व ठिकाणीं लागू पडते.

" समासभूयस्त्वम् " हा संस्कृतांत भाषासौष्ठवाचा एक प्रधान गुण समजला जातो. ' वैदर्भी ' भाषापद्धतीचें सुद्धां समासरचनेवांचून चालत नाहीं. ' गौडी ' चा तर समासप्राचुर्य हा प्राणच आहे. संस्कृतभाषेच्या निकट सान्निध्यानें व अनुकरणानें समासप्रयोग मराठींत घुसले, तरी तत्वतः शुद्ध मराठीचें समासांशीं फारसें सख्य नाहीं. पण समासविरहित रचनेचा दंडक, मराठींत पद्यरचना करतांना—विशेषतः परिणत व समृद्ध स्वरूपांत लिहिलेल्या संस्कृत वाङमयाचें मराठींत पद्य भाषान्तर करतांना—कडक रीतीनें पाळण्यांत आल्यास, " मेंढचावरी लोंकर दाट भारी । थंडीस त्याच्या बहुधा निवारी ", अशा तऱ्हेची पद्यरचना होऊन, भाषान्तराचा प्रयत्न निष्फळ व हास्यास्पद झाल्याशिवाय रहाणार नाहीं. तेव्हां, पद्यरचनेपुरता तरी हा

निर्बंध योग्य प्रमाणांत शिथिल केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. संस्कृत श्लोकाचा समग्र अर्थ त्याच्या मराठी भाषांतरांत, समासरचनेची मदत न घेतां, एकाच श्लोकांत समाविष्ट करणें, किती कठीण आहे, याचें प्रत्यंतर पाहणें असल्यास, मेघदूताच्या पहिल्याच श्लोकाचें मराठींत भाषान्तर करण्याचा प्रयत्न करून पहावा. असे, व याहीपेक्षां कठीण श्लोक मेघदूतांत अनेक आहेत.

**काव्यांतील अश्लीलता-वाद.**

सध्यांच्या कालीं अश्लीलतेच्या मुद्यावर बराच वादविवाद व चर्चा चालू आहे. चमत्कार हा कीं, संस्कृतांत एखादी अश्लील कल्पना उद्घोषित केलेली असल्यास, तीस फारशी हरकत घेतली जात नाहीं; पण तीच कल्पना जर साध्या सरळ मराठी भाषेंत उतरविली तर वाचकांच्या सदभिरुचीला धक्का बसल्याशिवाय राहत नाहीं! जणुं काय, संस्कृत ही पंडितांची भाषा असल्यामुळें, जें थोडेंबहुत अश्लीलतेचें वीष त्यांच्या प्रौढ बुद्धीच्या सहज पचनीं पडेल, तें सामान्य जनतेस जाचक होईल!! म्हणून, अशा एखाद्या संस्कृत श्लोकाचें, अगर श्लोकविभागाचें मराठींत भाषान्तर करतांना, कधीं कधीं निव्वळ संस्कृत शब्दांचा अवलंब केल्याशिवाय गत्यंतर नसतें. उदाहरणार्थः–" ज्ञातास्वादो विवृतजघनां को विहातुं समर्थः " ( पू. मे. श्लो. ४१ ); किंवा, " यः पण्यस्त्रीरतिपरिमलोद्गारिभिर्नागराणां" ( पू. मे. २५ ); अशा श्लोकविभागांचें शुद्ध मराठींत भाषांतर केल्यास तें " फाल्गुनी " साहित्याचा एक नमुना समजला जाईल अशी भीति वाटते. अतएव, अशा जातीच्या मराठी पद्यरचनेंत, योग्य प्रमाणांत व अवश्य तेवढे संस्कृत शब्द व संस्कृत समास वापरण्याची मोकळीक असलीच पाहिजे. किंबहुना योग्य प्रमाणांत संस्कृत भाषेची मदत घेतल्यास, मराठी कवितेस अभिजात व प्रौढ स्वरूप प्राप्त होऊन, तिचें अर्थबोधक्षमत्व विशेष वाढेल असें आमचें प्रामाणिक मत आहे.

मराठी कवितेस बहुशः यमकाची कायमचीच मगरमिठी पडल्यासारखी आहे. यमकाच्या इष्टानिष्टतेचा विचार करण्याचें हें

**यमक**

स्थल नाहीं. एवढें खरें कीं, यमक हा एक शब्दालंकार आहे, व त्याचें विशेष स्तोम माजविल्यास, काव्याची गळचेपी झाल्याशिवाय राहणार नाहीं. यमकाचा दंडक विशेष जाचक न व्हावा म्हणून सदृशनादवादी व्यंजनांचे जोड केल्यास सोइवार पडेल. उदाहरणार्थः-एकाच वर्गांतील अक्षरांचे, जसें, च आणि ज; प आणि भ; द आणि त; किंवा र, ल; न, ण; ष, स; क्ष, स इत्यादि अक्षरांचें कांहीं ठिकाणीं जोड दिल्यास कानांचें तात्पुरतें समाधान होऊन, काव्यरचनेस विशेष सवलत मिळेल. आधुनिक गुजराथी श्लोकरचनेंत एक विशिष्ट यमक-पद्धति प्रचारांत आल्यासारखी दिसते. वास्तविक, श्लोकाच्या पहिल्या व दुसऱ्या, किंवा तिसऱ्या व चवथ्या चरणांचीं शेवटचीं अक्षरें (व्यंजन+स्वर) हीं समाननादीं असावीं, हा मराठींत यमकाचा नियम आहे. गुजराथींत शेवटचीं व्यंजनें अजिबात वेगळीं असलीं तरी चालतात, पण स्वर मात्र एकच पाहिजे! या पद्धतीनें पद्यरचना बरीच सोपी होत असली, तरी यमकाचें कार्य मुळीच भागत नाहीं, की, टी; ज, प; ते, पे, या धर्तीचे यमक साधण्यापेक्षां यमकांस मुळांतच फांटा दिलेला काय वाईट? यमक साधण्याच्या कलेंत मोरोपंतांचें कौशल्य अद्वितीय आहे. केवळ चरणाच्या शेवटचें एकच अक्षर नव्हे, तर दोन दोन, तीन तीन, कधीं कधीं त्यांहूनही जास्त अक्षरें जोडून त्यांनें वाचकांची यमकाची हौस पुरविली आहे. आश्चर्य हें कीं, बहुतेक ठिकाणीं असे सर्वोत्कृष्ट यमक साधूनही, पंतांच्या कवितेंत बहुशः लेशमात्र रसहानि झालेली नाहीं. पण पद्यांतील प्रसाद कमी होऊं न देतां असे यमकाचे खेळ खेळणें हें अमर्याद भाषाप्रभुत्वाशिवाय साधणार नाहीं.

कालिदासाच्या कालासंबंधीं प्रश्न अद्यापिही कांहींसा वादग्रस्तच आहे.

**कालिदासाचा काल**

कालिदास भवभूतीचा समकालीन होता हा लोकप्रवाद निराधार आहे, याबद्दल आतां वाद राहिलेला नाही. मंडसोर येथील एका जुन्या देवालयांत मिळालेल्या इ. स. ४७३ च्या शिलालेखानें वरील प्रवादास कायमची मूठमाती दिली. या शिलालेखांत मेघदूताच्या उत्तरार्धांतील पहिल्या श्लोकाचा निःसंदेह अनुवाद केलेला आढळतो. कालिदासानें भवभूतीच्या उत्तररामचरितांतील एक श्लोक ( अविदितगतयामा रात्रिरेवं व्यरंसीत ) दुरुस्त केल्याची परंपरागत आख्यायिकाही विश्वसनीय नाहीं, हें निराळें सांगणें नको. कालिदासाचा संबंध तीन राजपुरुषांशी जोडण्यांत येतो. ( १ ) भोज ( २ ) विक्रमादित्य व ( ३ ) अग्निमित्र.

भोजराजाच्या पदरीं असलेल्या कालिदासानें 'नानार्थशब्दरत्न' नांवाचा एक ग्रंथ लिहिल्याचें ऐकिवांत आहे. या ग्रंथास त्याचा मित्र निचुल यानें 'तरला' नांवाची टीका लिहिली होती. हा, भोजराजाचा आश्रित कालिदास, निचुल व दिङ्नागांचा समकालीन असावा; हा काल इसवी ५–६ शतकाच्या सुमाराचा असल्यामुळें नानार्थशब्दरत्नाचा कर्ता कालिदास हा शाकुंतल, मेघदूताचा कर्ता नसून, तो त्या प्राचीन कालिदासाच्या कांहीं शतकें मागाहून झालेला, त्याच नांवाचा दुसरा कवि असला पाहिजे.

कालिदास विक्रमादित्याच्या पदरीं असल्याबद्दलचाही खात्रीलायक पुरावा उपलब्ध नाहीं. या मताच्या पुष्ट्यर्थ " धन्वन्तरी क्षपणकोऽमरसिंहशंकुः " या श्लोकाचाच बहुशः आधार दिला जातो. शिवाय कालिदासानें उर्वशी-पुरुरव्याच्या प्रेमसंबंधाच्या आधारें रचिलेल्या नाटकास दिलेलें " विक्रमोर्वशीय " हें नांव, व मेघदूतांत स्वर्गभूमी म्हणून केलेलें उज्जयिनीचें वर्णन, हे पुरावे पुढें करण्यांत येतात. उलटपक्षीं, कालिदासानें लिहिलेल्या ग्रंथांत विक्रमादित्याचा इतर कोणत्याही स्थलीं, ओझरताही उल्लेख सांपडत नाहीं, हेंही विसरून चालणार नाही.

"मालविकाग्निमित्र" नाटकाचा नायक अग्निमित्र याचा आश्रित कालिदास असावा असेंही एक मत प्रतिपादण्यांत येतें. अग्निमित्र हा शुंग-वंशीय बलाढ्य राजा पुष्यमित्र याचा मुलगा असून, इ. सनापूर्वी १००–१५० च्या सुमारास राजप्रतिनिधि म्हणून दशार्ण माळवा वगैरे प्रदेशांवर राज्य करीत होता. मालविकाग्निमित्र नाटकाचा प्रथम प्रवेश अग्निमित्राची राजधानी विदिशा (मा. अ. ५ अंक श्लो. १ पहा) नगरींत झालेला दिसतो. हल्लीं या शहरास "भिलसा" हें नांव असावें. दुष्यंत, पुरुरवा वगैरे राजांप्रमाणें अग्निमित्राचा उल्लेख इतिहासपुराणांत कोठेंही सांपडत नाहीं. तेव्हां कालिदासानें राजाश्रयाच्या लोभानें, किंवा त्या कालीं प्रसिद्ध व लोकप्रिय असलेल्या भासकवीच्या नाटकांस टक्कर देण्यासाठीं समकालीन राजा अग्निमित्र यास नायक कल्पून आपलें प्रथम नाटक लिहिलें असावें, असें आम्हास वाटतें.

हा वाद घटकाभर बाजूस ठेविला तरी वर उल्लेखिलेल्या मंडसोरच्या शिलालेखावरून पांचव्या शतकाच्या अखेरीस कालिदासाची कीर्ति सर्व देशभर पसरली असली पाहिजे हें निर्विवाद ठरतें. मेघदूतानंतर नेमिदूत, हंसदूत, कोकिलदूत, मनोदूत पार्श्वाभ्युदय, वगैरे मेघदूताच्या अनुकरणार्थ झालेले अनेक यत्न, या काव्याच्या प्रसिद्धीचे निदर्शक आहेत. मुद्रण-कलेच्या अभावीं, व अत्यंत मंदगामी प्रवाससाधनसामग्रीमुळें कोणत्याही कवीची हिंदुस्थानसारख्या अफाट देशांत इतकी प्रसिद्धि होण्यास कित्येक शतकांचा कालावधि लागणें अवश्य आहे. तेव्हां कालिदास इसवी सनाच्या पूर्वी १००–१५० वर्षे होऊन गेला असावा हें मतच जास्त सयुक्तिक दिसतें.

**काव्याची मूलभूत कल्पना**

मेघदूत काव्याची मूलभूत कल्पना कालिदासास कशी सुचली असावी, या प्रश्नाचाही ऊहापोह कांहीं ठिकाणीं केलेला आढळतो. स्वतः कालिदासावर यक्षाप्रमाणेंच निर्वासनाचा व भार्यावियोगाचा प्रसंग ओढवल्यामुळें त्यास हें काव्य लिहिण्याची स्फूर्ति झाली असावी असेंही विधान

क्वचित् आढळतें. पण त्यांत कांहीं तथ्य दिसत नाहीं. शेक्सपियरनें आपल्या अनेक नाटकांतून अनेक हृदयस्पर्शी प्रसंग चित्रित केले आहेत. त्या सर्वांचा किंवा त्यापैकीं बहुतेकांचा अनुभव त्यास प्रत्यक्ष आलेला असणें शक्य नाहीं. कवींची प्रतिभा निरंकुश, अप्रतिहत, व सर्वतोगामी असते. सीताहरणानंतर हनुमंतानें दूतकार्य पत्करून, रामाज्ञेनें सीतेची अशोकवनांत भेट घेतली, या रामायणांतील विख्यात प्रसंगानें, कवीस मेघदूताची कल्पना बहुधा सुचली असावी ( उत्तरमेघ श्लो. ३७ पहा ). मेघदूतांतील कांहीं कल्पना, व रामायणांतील मारुतीदौत्य व सीतावियोग या विशिष्ट भागांतील कांहीं कल्पना यांचें विलक्षण सादृश्य आहे. ( उ. मे. श्लो. ३२, ३३, २९, २०, २१, व ४४ पहा ). *

---

*(१) तस्याः शुभं वाममरालपक्ष्मराजीवृतं कृष्णविशाल शुक्लम् ।
प्रास्पन्दतैकं नयनं सुकेश्या मीनाहतंपद्ममिवाभिताम्रम् ॥
रामायण ( सुन्दरकाण्ड सर्ग २९ श्लो. २ )

( २ ) गजेन्द्रहस्तप्रतिमश्च पीनस्तयोर्द्वयोः संहतयोः सुजातः ।
प्रस्यन्दमानः पुनरूरुरस्या रामं पुरस्तात् स्थितमाचचक्षे ॥
रामायण ( सुन्दरकाण्ड सर्ग २९ श्लो. ४ )

( ३ ) एकवेणीधरा दीना भर्तृचिन्तापरायणा ।
अधः शय्या विवर्णाङ्गी पद्मिनीव हिमागमे ॥
रामायण ( सुन्दरकाण्ड सर्ग ५९ श्लो. ३० )

( ४ ) मेघलेखापरिवृता चन्द्रलेखेव निष्प्रभा ॥
रामायण ( सुन्दरकाण्ड सर्ग ५९ श्लो. २५ )

( ५ ) ह्रीमहतनलिनीवनष्टशोभा व्यसनपरंपरया निपीड्यमाना ।
सहचररहितेव चक्रवाकी जनकसुता कृपणां दशां प्रपन्ना ॥
रामायण ( सुन्दरकाण्ड सर्ग १६ श्लो. ३० )

( ६ ) वाहि वात यतः कान्ता तां स्पृष्ट्वा मामपि स्पृशेः ।
त्वय्येतत्कामयानस्य शक्यमेतेन जीवितुम् ॥
रामायण ( किष्किंधा. सर्ग १ श्लो. ५३ )

आमच्या मतें, रघुवंशाचा तेरावा सर्ग लिहून, लंकेपासून शरयूपर्यंत दक्षिण हिंदुस्थानचा प्रदेश आपल्या प्रभावी लेखणीनें वर्णिल्यानंतर, उत्तर हिंदुस्थानांतल्या आपल्या आवडीच्या मुख्य मुख्य स्थलांचा तशाच रीतीनें परामर्श घ्यावा अशी इच्छा कालिदासास झाली असणें साहजिक आहे; व या इच्छेंतच या काव्याचा प्रादुर्भाव संभवतो. दक्षिणेच्या स्थलांपेक्षां उत्तर हिंदुस्थानांतील स्थलें, त्याच्या विशेष परिचयाचीं व आवडीचीं असल्यामुळें, मेघदूतांतील स्थलवर्णनें जास्त बहारीचीं उतरणें क्रमप्राप्तच होतें.

**कालिदासाचें जन्मस्थल**

कालिदासाचा जन्म हिंदुस्थानांतील कोणत्या प्रदेशांत झाला असावा, हाही एक वादग्रस्त प्रश्न आहे. कुमारसंभवांतील, व मेघदूतांतील, हिमालय पर्वताचीं अत्यंत सुंदर व सत्य-स्थितिनिदर्शक वर्णनें, व कालिदासाचें या पर्वतराजा-संबंधीं प्रेम व भक्ति लक्षांत घेतां, त्याचें जन्मस्थल काश्मीरची सौंदर्यनिधानभूमी असावीसें वाटतें. काश्मीरच्या प्रवासांत आम्हांस एक चमत्कारिक प्रकार आढळून आला कीं, तिकडच्या जंगलांतील अस्वलांना माणसांवर हल्ला करून त्यांचीं नाकें ओरबडून काढण्याची एक विचित्र खोड आहे. या गोष्टीचा आणि शाकुंतलाच्या दुसऱ्या अंकांत विदूषकाच्या तोंडीं घातलेल्या उक्तीचा ( " त्वं तावदटवीतोऽटवीमाहिण्डमानो-नरनासिकालोलुपस्य जीर्णऋक्षस्य कस्यापि मुखे पतिष्यसि " ) मेळ लक्षांत घेतां, कालिदास बहुशः काश्मीरी पंडित असण्याचा संभव दिसतो. प्रमाणभूत मानलेल्या ग्रंथांत नमूद केलेल्या कांहीं मतांचा अनुवाद करण्यापलीकडे आम्ही कालिदासाच्या स्थलकालासंबंधीं स्वतंत्र विचार केलेला नाहीं.

हें भाषांतर शक्य तेवढें मूळ श्लोकाचा अर्थ अंशतःसुद्धां सुटूं न देतां करण्याचा यत्न केला आहे. भाषान्तर समश्लोकी असल्यामुळें, नाइला-जानें कांहीं किरकोळ शब्द, भाषांतरांतून सुटले आहेत. पण त्यामुळें, मूळ श्लोकांतील अर्थबोधास बाध येणार नाहीं, असा विश्वास आहे. असे मूळ

संस्कृत श्लोकांतील शब्द जे भाषांतरांतून नाइलाजानें सुटले आहेत, त्यांचा टीपांत स्पष्ट उल्लेख केला असून, जरूर वाटलें तेथें त्यांवर निराळ्या टीपाही दिल्या आहेत. प्रक्षिप्त मानलेले श्लोक जमेस न धरिल्यामुळें फक्त ११५ श्लोकांचेंच भाषांतर केलें आहे.

---

कोणतेंही पुस्तक लिहून तयार करण्यापेक्षांही ते व्यवस्थितपणें छापून प्रसिद्ध करणें हें केव्हां केव्हां जास्त श्रमाचें व दगदगीचें काम असतें; सुदैवानें माझे व्यवसायबंधु व प्रेमळ मित्र श्रीयुत भालचन्द्र सि. सुकथनकर, सॉलिसिटर (कवि "भालेन्दु") यांनीं हें काम हौसेनें व पूर्ण आपुलकीच्या भावनेनें बहुतेक आपल्या आंगावर घेतल्यामुळेंच हें पुस्तक इतक्या लवकर व शक्य तितक्या सुबक रीतीनें छापून काढणें शक्य झालें. पुस्तकाचा कच्चा खर्डा तयार झाल्यावर, तो त्यांनीं अत्यंत कसोशीनें व बारकाईनें तपासून पाहून भाषान्तराबद्दल अनेक उपयुक्त सूचना केल्या; व निवळ मराठी वाचकांस हा ग्रंथ सुबोध व्हावा या उद्देशानें टीपा यथावकाश अधिक विस्तृत करून त्याची उपयुक्तता वाढविली. हा यत्न लोकादरास पात्र झाल्यास त्याचें बरेचसें श्रेय श्रीयुत सुकथनकर यांस आहे. हें पुस्तक संपूर्ण छापून झाल्यावर त्यांत नजरचुकीनें किंवा छापतांना कांहीं दोष राहिलेले आढळल्यामुळें पुस्तकाच्या शेवटीं शुद्धिपत्र जोडणें भाग पडलें; त्यावर वाचकांनीं नजर टाकण्यास चुकूं नये.

पुस्तक छापून झाल्यानंतर, प्रसिद्ध करण्यापूर्वी, त्यास एखाद्या नांवाजलेल्या व प्रसिद्ध साहित्यिकाकडून उपोद्घात लिहून घेऊन पुस्तकास जोडण्याची कल्पना मनांत आली. अशा पुस्तकाची चिकित्सक बुद्धीनें छाननी करून त्यावर उद्बोधक व विचारपरिप्लुत लेख लिहिण्यास लायक अशीं जीं अधिकारी माणसें महाराष्ट्रांत थोडीं बहुत आहेत, त्यांत श्रीयुत नरसिंह चिंतामण केळकर यांचें नांव प्रामुख्यानें सुचणें क्रमप्राप्तच होतें. मराठी

वाङ्मयाच्या क्षेत्रांत आज २५।३० वर्षें जे सरस्वतीभक्त प्रामुख्यानें चमकत आहेत, त्यांत श्रीयुत केळकरांची जागा फारच उच्च दर्जाची आहे. माझें " रत्नावली नाटिका " (मराठी भाषान्तर) १९२८ सालीं प्रसिद्ध झाल्यावर, माझी व त्यांची तोंडओळखही नसतां, त्यांनीं माझ्या पत्रद्वारें केलेल्या विनंतीवरून तें पुस्तक काळजीपूर्वक वाचून त्यावर विस्तृत अभिप्राय देण्याची मेहरबानी केली होती. यावेळींही, त्यांनीं मुळींच आढेवेढे न घेतां अभिनंदनपर दोन शब्द लिहून दिले, ही गोष्ट त्यांच्या सौजन्यास व साहित्यप्रेमास साजेशीच आहे.

माझे मित्र श्रीयुत मङ्गेश क. नाडकर्णी ( बडोद्याचे माजी सुभेसाहेब व सध्याचे धर्माधिकारी ) यांनींही पुस्तकाचा कच्चा खर्डा वाचून त्यासंबंधीं कांहीं उपयुक्त सूचना करण्याचे श्रम घेतले. तसेंच माझे परमपूज्य वडील श्रीयुत आत्माराम पुरुषोत्तम उर्फ भाऊसाहेब सबनीस यांनीं भाषांतर काळजीपूर्वक वाचून या प्रयत्नास आपला शुभाशिर्वाद दिला हें नमूद करण्यास साभिमान आनंद वाटतो.

भाषांतराच्या आरंभींचें तीनरंगी तैलचित्र माझे तरुण मित्र व होतकरू चित्रकार श्रीयुत शामराव गणपत लाड यांनीं खास या पुस्तका-साठीं तयार करून दिलें. तें सुंदर व वस्तुस्थितीनिदर्शक साधलें आहे. इतर चित्रें मुंबईचे प्रसिद्ध चित्रकार रा. ब. धुरंधर यांनीं पूर्वीं काढलेल्या मेघदूतविषयक चित्रांच्या छापील नकला आहेत.

या सर्व आप्तेष्टांचा व सज्जनांचा मी अन्त.करणपूर्वक आभारी आहे. तसेंच, मुंबई वैभव छापखान्याच्या चालकांनीं पुस्तक अल्पावधींत, शक्य तितकें बिनचुक व सुबक छापून दिल्याबद्दल त्यांचेही आभार मानणें योग्य आहे.

मुंबई, १५ मार्च १९३८ ग्रंथकर्ता

## ( कविराज टागोर यांच्या मेघदूतविषयक सूक्ताचें मराठी रूपांतर )

( १ ) दिव्यप्रीतिनिकेतनीं त्रिभुवनीं वागीशचूडामणी ।
स्वर्गीचा कवि कालिदास विलसे साहित्यसिंहासनीं ॥
आनंदें प्रतिभावधूसह रमे, सेवोनि, सन्मंगल ।
विश्वोत्पन्न सुनाद, जो नित तया दे स्फूर्तितें सोज्वल ॥

( २ ) प्रेमें पायघडी तया हरितशी पाचूपरी घालित ।
भूदेवी; वरती वितान पसरी आकाश ताराङ्कित ॥
नाचोनी ऋतुदेवता सभंवतीं, नाना परीच्या सुरा ।
देती, तन्नवयौवनोत्सव करूं जातां मुदें साजिरा ॥

( ३ ) नाहीं लेशहि दुःख कष्ट; सगळीं सौख्येंहि विश्वांतलीं ।
ठेलीं जोडुनि हात; सन्निध सखी सौंदर्यरत्नावली ॥
नित्याची नवयौवनक्षम तनू, मधार्कही प्यावया ।
केले नंदनिचा सुमप्रकर जे यत्नेंचि गाळोनियां ॥

* * * * * *

---

१. मूळ सूक्त बंगाली भाषेंत आहे, त्याचें प्रो. जी. एच. रूक साहेबानें इंग्रजी रूपान्तर करून तें आपल्या मेघदूताच्या इंग्रजी भाषांतरास जोडिलें आहे. मूळांतील कल्पना हृदयंगम वाटल्यावरून ती मराठींत रूपान्तरीत करण्याचा प्रयत्न आम्ही केला आहे. अर्थात्, हें रूपान्तर प्रो० रूक साहेबांच्या इंग्रजी कवितेचें आहे. २ हें "Love's primal paradise', या इंग्रजी मूळांतल्या शब्दांचें रूपान्तर आहे. ३. साहित्यसाम्राज्याच्या सिंहासनावर. ४. काव्यकल्पना हीच जणुं पत्नी. ५. तारे आणि ग्रहमंडलें यांच्या सतत परिभ्रमणानें विश्वांत एक अत्यंत मधुर नाद घुमत असतो, व तो पुण्यशील महात्मे व प्रतिभावान् कवी यांस आनंद आणि स्फूर्ति देतो, असा समज आहे. ६. सौंदर्याच्या सर्व उत्कृष्ट कल्पना एक जागीं करून, त्यांस दिलेलें मूर्तस्वरूप. ७. पुष्पसंभार; ( नंदनवनिंचा पुष्पसंभार. )

* * * * * *

( ४ ) दुर्दैवें घडि साधली, चळ भरे चित्ता मदें त्याचिया ।
इन्द्रें शापुनि धाडिला धरणितें जन्मैक भोगावया ॥
स्वर्गातूनि घडे झणीं पतन, घे पृथ्वीवरी बापुडें ।
मर्त्यांचें जनु[8], दूर हो प्रियतमा, कीं वज्र माथीं पडे ॥

( ५ ) गेलीं स्वर्ग-सुखं, प्रियेस मुकला, निस्तेज झाला तरी ।
चिंती प्राग्भवभांवबन्धनदृढं[9] तो सौहृदं[10] अन्तरीं ॥
वर्षावैभव[11] पाहुनी उसळली निद्रिस्त पूर्वस्मृती ।
कारुण्यैकरसा कवीश्वर रची या मेघदूतांत ती[12] ॥

---

८. जन्म; " जनु " हा शब्द योजण्यांत हीनत्व किंवा क्षुद्रत्व यांचाही बोध व्हावा हा हेतू आहे. ९. पूर्वजन्मींचे जे संस्कार, त्यांच्या भावबंधनांनीं दृढ झालेले, ( स्नेहसम्बन्ध ). १०. स्नेहसंबंध; लागेबांधे.

**कल्पनासादृश्यः**—तच्चेतसा स्मरति नूनमबोधपूर्वं ।
भावस्थिराणि जननांतरसौहृदानि ॥ ( शा. ५.२ ).

११. पावसाळ्यांतील सृष्टिवैभव. १२. ती, म्ह० ती पूर्वस्मृति, जी ह्या मेघदूतांत रचिली गेली आहे ती.

# संक्षिप्त शब्दांचा खुलासा

| | | |
|---|---|---|
| उ. मे. | मेघदूतकाव्यम्, उत्तरमेघः | ( निर्णयसागर; श्लोक ). |
| उत्तर. | उत्तररामचरितम् | ( निर्णयसागर; सर्ग; श्लोक ). |
| ऋ. सं. …… | ऋतुसंहार | ( ,, ,, ,, ). |
| किरा ……… | किरातार्जुनीयम् | ( ,, ,, ,, ). |
| कु. सं. …… | कुमारसंभवम् | ( ,, ,, ,, ). |
| गी. गो. …… | गीतगोविन्दकाव्यम् | ( ,, अष्टक; सर्ग; श्लोक ). |
| पू. मे. …… | मेघदूतकाव्यम्, पूर्वमेघः | ( ,, ,, श्लोक ). |
| मा. मा ……. | मालतीमाधवम् | ( ,, अंक; श्लोक ). |
| मालवि. …… | मालविकाग्निमित्रम् | ( ,, ,, ,, ). |
| रघु. ……… | रघुवंशम् | ( ,, सर्ग; श्लोक ). |
| रतिर ……… | रतिरहस्यम् | ( मल्लिनाथाप्रमाणें ) |
| रतिस ……… | रतिसर्वस्वम् | ( ,, ) |
| रामा. कि. …. | वाल्मिकीरामायण; | ( किष्किन्धाकाण्ड ) |
| रामा. सुन्द. … | ,, ,, | ( सुन्दरकाण्ड ) |
| विक्रमो. …… | विक्रमोर्वशीयम् | ( निर्णयसागर; सर्ग; श्लोक ). |
| शा. ……… | अभिज्ञानशाकुन्तलम् | ( निर्णयसागर ,, ,, ). |
| शिशु. …… | शिशुपालवधम् | ( ,, ,, ,, ). |
| सु. र. भा. … | सुभाषितरत्नभाण्डागारम् | ( चौखम्बासंस्कृतसीरिज ). |




**मेघदूतांत वर्णिलेला मेघाचा मार्ग**

( ठिपक्यांच्या रेषेनें दर्शविला आहे )



आषाढाच्या प्रथम दिवशीं अद्रिच्या तुंग भालीं ।
पाहे मेघा, गजवर करी जेंवि उत्खातकेली ॥
(पू. मे. श्लो. २)

* * * * * *

रक्षायातें असु रमणिचे, जों नभोमास येत ।
योजावा हा जलद अपुला क्षेमसंदेशदूत ॥
या भावें, तो कुटजकुसुमां घेउनी नूतनांतें ।
हर्षें पूजी, करि मधुवचं, तोयदा स्वागतातें ॥
(पू. मे. श्लो. ४)

# मेघदूत काव्याचें मराठी समवृत्त
# व समश्लोकी
# भाषांतर

---

सूचनाः—मूळ संस्कृत श्लोकांत ज्या शब्दाखालीं रेघ आहे, ते शब्द भाषान्तरांतून वगळिलेले आहेत, व त्यांचा अर्थ खालीं टीपांत दिला आहे.

# पूर्वमेघ.

( १ ) पावे शाप, स्वसखिविरहें दीर्घ, सत्वा[1]पहारी ।
वर्षाचा, जो, धनपति[2]रुषें, जें[3] चुके स्वाधिकारीं ॥
ऐसा यक्ष क्रमि दिन कुणी, सांवली जेथ दाट ।
सीतास्नानें शुचिजल अशा रामगिर्याश्र[4]मांत ॥

( २ ) कामी, कान्तेविण, गिरितटीं लोटि तो मास कांहीं ।
तेणें त्याच्या कनक[5]वलय क्षीणहस्तीं न राही ॥
आषाढाच्या प्रथम दिवशीं अद्रिच्या तुंग[6] भालीं ।
पाहे मेघा, गजवर करी जेंवि उत्खात[7]केली ॥

( ३ ) कष्टें राहे बघतचि तिथें दृश्य तें मोह[8]कारी ।
रोधी[9] बाष्पें नयनिं, चिर तो मग्न झाला विचारीं ॥
होती उत्[10]कंठित सुखिहि ते लोक मेघोदयानें ।
कान्तां[11]श्लेषातुर वि[11]रहितां दुःख तें काय सानें ? ॥

( ४ ) रक्षायातें असु रमणिचे, जों नभोमा[12]स येत ।
योजावा हा जल[13]द अपुला क्षेमसं[14]न्देशदूत ॥
या भावें, तो कुटजकुसुमां घेउनी नूतनांतें ।
हर्षें पूजी, करि मधुवचें तोयदा स्वागतातें ॥

---

१. सत्त्व म्ह० आत्मप्रभाव; " क्रियासिद्धिः सत्त्वे भवति महतां नोपकरणे " ( भोजप्रबंध श्लो० १६७ ). २. धनपति म्ह० कुबेर; त्याच्या रुषें म्ह० क्रोधानें. नेमलेल्या कामांत चूक केल्यामुळें, कुबेरानें यक्षाला एक वर्षपर्यंत अलकावतींतून हद्दपार केलें होतें. ३. जेव्हां. ४. मुळांत " रामगिर्याश्रमेषु " असा शब्दप्रयोग आहे. यक्ष वियोगानें अस्वस्थचित्त असल्यामुळें, तो एकाच आश्रमांत फार वेळ न टिकतां, निवासस्थानें वारंवार बदलीत होता, असा भावार्थ दिसतो.

५. **कल्पनासादृश्य:**—( अ ) प्रत्याख्यातविशेषमंडनविधिर्वामप्रकोष्ठार्पितम् ।
विभ्रत्कांचनमेकमेव वलयं श्वासापरक्ताधरः ॥ ( शा. ६.६ ).
(आ) अनभिलुलितज्याघातांकं मुहुर्मणिबंधना-
त्कनकवलयं स्रस्तं स्रस्तं मया प्रतिसार्यते ॥ (शा. ३.१० ).
( इ ) " नाकामीमंडनप्रियः " (सु. र. भां. पृ.१७१. श्लो.५१० ).
कनकवलयादि अलंकार वापरणें हें कामीजनांचें लक्षण आहे.

६. **कल्पनासादृश्य:**—उपचितघनमालप्रौढतापिच्छनीलः ।
श्रयतिशिखरमद्रेर्नूतनस्तोयवाहः ॥ ( मा. मा. ९.२४ ).

# पूर्वमेघ.

(१) कश्चित्कान्ताविरहगुरुणा स्वाधिकारात्प्रमत्तः
शापेनास्तंगमितमहिमा वर्षभोग्येण भर्तुः ।
यक्षश्चक्रे जनकतनयास्नानपुण्योदकेषु
स्निग्धच्छायातरुषु वसतिं रामगिर्याश्रमेषु ॥

(२) तस्मिन्नद्रौ कतिचिदबलाविप्रयुक्तः स कामी
नीत्वा मासान्कनकवलयभ्रंशरिक्तप्रकोष्ठः ।
आषाढस्य प्रथमदिवसे मेघमाश्लिष्टसानुं
वप्रक्रीडापरिणतगजप्रेक्षणीयं ददर्श ॥

(३) तस्य स्थित्वा कथमपि पुरः कौतुकाधानहेतो-
रन्तर्बाष्पश्चिरमनुचरो राजराजस्य दध्यौ ।
मेघालोके भवति सुखिनोऽप्यन्यथावृत्ति चेतः
कण्ठाश्लेषप्रणयिनि जने किं पुनर्दूरसंस्थे ॥

(४) प्रत्यासन्ने नभसि दयिताजीवितालम्बनार्थी
जीमूतेन स्वकुशलमयीं हारयिष्यन्प्रवृत्तिम् ।
स प्रत्यग्रैः कुटजकुसुमैः कल्पितार्घाय तस्मै ।
प्रीतः प्रीतिप्रमुखवचनं स्वागतं व्याजहार ॥

---

७. हत्ती पुढचे पाय वांकवून डोंगराच्या कड्याला टकरा देऊन माती उकरतो. हा त्याचा आवडता खेळ आहे. ८. मोहकारी म्ह० मनोन्माद, किंवा चित्तविभ्रम उत्पन्न करणारें. ९. हें धीरोदात्त नायकाचें लक्षण आहे. १०. प्रियसंगमोत्सुक; नवमेघोदयानें कामोद्दीपन होतें, ही संस्कृत कवींची आवडती कल्पना आहे. **कल्पनासादृश्यः–**

(अ) सशीकराम्भोधरसंगशीतलः समीरणः कं न करोति सोत्सुकं ॥ ( ऋ. सं.२.१७ ).

(आ) अपहृतमिव चेतस्तोयदैः सेन्द्रचापैः । पथिकजनवधूनां तद्वियोगाकुलानाम् ॥(ऋ.सं.२.२२).

(इ) नववारिधरोदयादहोभि-र्भवितव्यं हि निरातपर्धिरम्यैः ॥ ( विक्रमो. ४.१० ).

(ई) धारासिक्तवसुंधरासुरभयः प्राप्तास्त एवाधुना
घर्माम्भोविगमागमव्यतिकरश्रीवाहिनो वासराः ॥ ( मा. मा. ९.१७ ).

(उ) दिवस इवार्धश्यामस्तपात्यये जीवलोकस्य । ( शा. ३.९ ).

११. ( कान्ता+आश्लेष ); आपापल्या बायकांस आलिंगण्यास आतुर झालेले विरही लोक. १२. नभोमास, म्हणजे इंग्रजी जुलै–आगष्ट; ' नभस् ' म्ह० श्रावण महिना. १३. जलद म्ह० जल देणारा, अर्थात् मेघ. १४. क्षेमसमाचार पाठविण्यासाठीं दूत.

(५) धूम, ज्योती, जल, पवन यांपासुनी मेघ होती[1] ।
वूर्ती योग्या करण[2]पटुता त्यांत कैसी, अहो ! ती ? ॥
हें उत्कंठाविधुर विसरे, प्रार्थि मेघा, बिचारा ।
योग्या[3]योग्यीं स्मरह[4]त न दे लेश थारा विचारा ॥

(६) घेसी जन्मा सुविदित कुलीं पुष्करा[5]वर्तकांचे ।
मंत्री, तूं गा ! विबुधपतिचा रूप घेसी रुचे जें ॥
तेणें प्रार्थी तुज, विधिवळें होउनी बंधुहीन ।
याञ्चा वन्ध्या गुणिजनिं बरी, सत्फला दुर्जनीं न ॥

(७) संत[6]प्तांचा असांस, जलदा ! तूं सखा; स्वामिशापें ।
जी मत्कान्ता मुकलि मजला, तोषवीं ती निरोपें ॥
जाणें तूतें नगरि अलका जेथ यक्षेश्व[7]रांची ।
सद्में इन्दू धवलित करी शर्व[8]भालस्थ जीचीं ॥

(८) आशालोला, पवनपथिं तूं चालतां, पान्थकान्ता ।
न्याहाळीती वरि उचलुनी भालिंच्या कुंतलांन्तां ॥
येतां तूझे दिन न विधुरा प्रेयसी सेवि कोण ? ।
नोहे माझ्यापरि जरि दुजा, जो पराधीन दीन ॥

(९) मार्गी तूतें प्रियसुहृदसे प्रेरिती मंद वारे ।
डावे होती रव मधुरही चा[1]तकांचे तुझ्या, रे ॥
गर्भाधा[2]नोत्सव तव घडे दर्शनें, जाणुनीयां ।
येती पंक्ती गगनिं तुजला, सा[3]रसांच्या, पहाया ॥

---

१. हें मेघांचें पृथक्करण कालिदासाच्या वेळीं प्रचलित असलेल्या कल्पनेप्रमाणें आहे. २. इंद्रियांचें कार्यक्षमत्व. ३. मूळ श्लोकांत सजीव व निर्जीव यांमधील भेद कामांधांस कळत नाहीं, असा शब्दप्रयोग आहे.

४. **कल्पनासादृश्य**—(अ) अत्यारूढो हि नारीणामकालज्ञो मनोभवः । ( रघु. १२.३३ ).
(आ) कामातुराणां न भयं न लज्जा । ( सु. र. भां. श्लो. ८४६ पा. १७९ ).
( इ ) नैव पश्यति जात्यंधः कामान्धो नैव पश्यति । ( सु. र. भां. पृ. १६५ श्लो. २८२).

५. इन्द्रानें तोडलेल्या पर्वतांच्या पंखांपासून उत्पन्न झालेल्या मेघांस " पुष्करावर्तक " म्हणतात. ' आवर्तक ', ' कुंजर ', ' जीमूत ' वगैरे मेघांचे अनेक प्रकार आहेत; ते प्रलय-कालीं वृष्टि करितात. ६. हा शब्द द्व्यर्थी योजिला आहे:—(अ) ग्रीष्मकाळांतील उकाड्यानें हैराण झालेले (आ) संकटग्रस्त. ७. यक्षेश्वर म्ह० कुबेर. "मानार्थे बहुवचनम्".८. शर्व म्ह०

(५) धूमज्योतिः सलिलमरुतां संनिपातः क्व मेघः
संदेशार्थाः क्व पटुकरणैः प्राणिभिः प्रापणीयाः ।
इत्यौत्सुक्यादपरिगणयन्गुह्यकस्तं ययाचे
कामार्ता हि प्रकृतिकृपणाश्चेतनाचेतनेषु ॥

(६) जातं वंशे भुवनविदिते पुष्करावर्तकानां
जानामि त्वां प्रकृतिपुरुषं कामरूपं मघोनः ।
तेनार्थित्वं त्वयि विधिवशाद्दूरबन्धुर्गतोऽहं
याच्ञा मोघा वरमधिगुणे नाधमे लब्धकामा ॥

(७) संतप्तानां त्वमसि शरणं तत्पयोद प्रियायाः
संदेशं मे हर धनपतिक्रोधविश्लेषितस्य ।
गन्तव्या ते वसतिरलका नाम यक्षेश्वराणां
† बाह्योद्यानस्थितहरशिरश्चन्द्रिकाधौतहर्म्या ॥

(८) त्वामारूढं पवनपदवीमुद्गृहीतालकान्ताः
प्रेक्षिष्यन्ते पथिकवनिताः प्रत्ययादाश्वसन्त्यः ।
कः संनद्धे विरहविधुरां त्वय्युपेक्षेत जायां
न स्यादन्योऽप्यहमिव जनो यः पराधीनवृत्तिः ॥

(९) मन्दं मन्दं नुदति पवनश्चानुकूलो यथा त्वां
वामश्चायं नदति मधुरं चातकस्ते §सगन्धः ।
गर्भाधानक्षणपरिचयान्नूनमाबद्धमालाः
सेविष्यन्ते $ नयनसुभगं खे भवन्तं बलाकाः ॥

---

शंकर; अलका कैलासाच्या अत्यंत जवळ असल्यामुळें, तींतील घरांवर शंकराच्या कपाळीं असलेल्या चंद्राचा प्रकाश बाराही महिने पडतो अशी कल्पना आहे. ९ आशेनें ज्यांचीं मनें उल्लसित झालीं आहेत, अशा. मेघोदय झाल्याबरोबर आपले प्रवासी पती शक्य तितक्या लवकर घरीं आल्याशिवाय रहाणार नाहींत, या दृढ विश्वासानें आशेचा उदय झाला आहे. १०. केसांच्या टोंकांस, अग्रप्रांतांस, शेवटांस. ११. प्रिय मित्रासारखे अनुकूल; हे दोन्ही शुभ शकुन गणले जातात.

**कल्पनासादृश्यः**— पवनस्यानुकूलत्वात्प्रार्थनासिद्धिशंसिनः । ( रघु. १.४२ ).
१२. मेघदर्शनानें बगळ्यांची गर्भधारणा होते असा समज आहे. गर्भं बलाका दधतेऽभ्रयोगान्नाके निबद्धालयः समंतात् । ( मल्लिनाथ ). १३. सारस म्ह० बगळे.

---

† शहराच्या बाहेरच्या उपवनांत वस्ती करून राहिलेला. § "सगन्धः" हा शब्द द्व्यर्थी योजिला आहे:-( १ ) गर्विष्ठ. (२) संबंधी. $ " नयनसुभगं " म्ह० सुंदराला.

( १० ) जाई वेगें, तव वहिनितें, सोडुनी भीति, पाहें ।
कष्टें जीवा जगवुनि सती, जी दिनां मोजिताहे ॥
भंगूं पाहे हृदय विरहें लोलें पुष्पासमान ।
स्त्रीचें, आशा टिकवि बहुधा, एक आधार जाण ॥

( ११ ) जागोजागीं उठति कदली, हो धरित्री रसाळा ।
जेणें, तूझा रव मधुर तो, ऐकुनी, मानसाला ॥
जाणारे जे, बिसकिसलयें घेउनीयां फराळ ।
कैलासांती सहचर तुझे होति मार्गीं, मराळ ॥

( १२ ) आलिंगोनी तव गिरिसखा घे निरोपा, जयाच्या ।
श्रोणीभागीं विलसति खुणा रामपादांबुजांच्या ॥
जेव्हां कालें पडत तुमची गांठ वर्षावसानें ।
सोडावीं तैं प्रणयपिशुनें उष्णबाष्पं जयानें ॥

( १३ ) ऐकें आधीं तुज कथितसें मार्ग जो सोईवार ।
संदेशा मी श्रुतिसुखदशा मागुती सांगणार ॥
जेणें जातां, पद गिरिशिरीं ठेवुनी घे विसांवा ।
ताजें पाणी वनतटिनिचें सेवुनी शीण जावा ॥

---

१. वहिनी ( मुळांत, " भ्रातृजाया " ); हा शब्द कवीनें फार चतुराईनें वापरला आहे, व तो यक्षाचा मेघावरील भ्रातृभाव व विश्राम सुचवीत आहे. भ्रातृजायेला भेटण्यांत ( एकांतांत ) मनांत शंकित होण्याचें मुळींच कारण नाहीं. " अवश्यं पश्यसि ", म्ह० भीति किंवा शंका सोडून भेट. २. नाजूक: कोमल.

३. **कल्पनासादृश्यः**–(अ) आशातंतुर्न च कथयतात्यंतमुच्छेदनीयः ।
प्राणत्राणं कथमपि करोत्यायताक्ष्याः स एकः ॥ (मा. मा. ९.२६).
( आ ) गुर्वपि विरहदुःखमाशाबन्धः साहयति ॥ ( शा. ४.१५).

४. " शिलींध्रा ", या शब्दाचा अर्थ चिपळुणकरांनीं ' छत्री ' असा केला आहे. मल्लिनाथ " कंदल्यां च शिलींध्रा स्यात् " असा अर्थ करतो. आपट्यांच्या कोशांत ' छत्री ' म्ह० fungus, mushroom, याचा समानार्थक, ' शिलींध्रक ' किंवा ' कदलीकुसुम ' असा दिला आहे. "शिलींध्रा" म्हणजे कोंकणांत ज्यांना 'चवई' म्हणतात त्या असाव्यासें वाटतें.
**कल्पनासादृश्यः**—( अ ) उद्यत्कंदलकान्तकेतकभृतः कच्छाः सरित्स्रोतसा-
माविर्गन्धशिलीन्ध्रलोध्रकुसुमस्मेरा वनानां ततिः ॥ (मा. मा. ९.१६).

(१०) तां चावश्यं दिवसगणनातत्परामेकपत्नी-
मव्यापन्नामविहतगतिर्द्रक्ष्यसि भ्रातृजायाम् ।
आशाबन्धः कुसुमसदृशं प्रायशो ह्यङ्गनानां
सद्यःपाति प्रणयि हृदयं विप्रयोगे रुणद्धि ॥

(११) कर्तुं यच्च प्रभवति महीमुच्छिलीन्ध्रामवन्ध्यां
तच्छ्रुत्वा ते श्रवणसुभगं गर्जितं मानसोत्काः ।
आ कैलासाद्बिसकिसलयच्छेदपाथेयवन्तः
संपत्स्यन्ते नभसि भवतो राजहंसाः सहायाः ॥

(१२) आपृच्छस्व प्रियसखममुं *तुङ्गमालिङ्ग्य शैलं
वन्द्यैः पुंसां रघुपतिपदैरङ्कितं मेखलासु ।
काले काले भवति भवतो यस्य संयोगमेत्य
स्नेहव्यक्तिश्चिरविरहजं मुञ्चतो बाष्पमुष्णम् ॥

(१३) मार्गं तावच्छृणु कथयतस्त्वत्प्रयाणानुरूपं
संदेशं मे तदनु जलद श्रोष्यसि श्रोत्रपेयम् ।
खिन्नः खिन्नः शिखरिषु पदं न्यस्य गन्तासि यत्र
क्षीणः क्षीणः परिलघु पयः स्रोतसां चोपभुज्य ॥

---

(आ) कालाश्रयोगादुदिता शिलीन्ध्रा । संपन्नसस्यां कथयन्ति धात्रीम् ॥ मल्लिनाथ (निमित्तनिदान)
५. समृद्ध किंवा फलवती. ६. गंभीर व गोड मेघगर्जना ऐकून पृथ्वी समृद्ध होते, अशी कल्पना आहे. ७. कमलतंतूंचीं कोमल अग्रें, तुकडे. ८. कैलासापर्यंतचे. ९. हंसपक्षी; (जे मेघगर्जना ऐकून मानससरोवराच्या रस्त्यास, तोंडांत कमळतंतूंचा फराळ घेऊन लागतात). १०. गिरिसखा, म्ह. रामगिरी पर्वत, मेघाचा सखा, ज्यावर यक्षाचा वास आहे. ११. मध्यभागावर. १२. या पर्वतावर लंकेस जातांना श्रीराम विसाव्यांसाठीं राहिले; व त्यावर श्रीरामचरणांच्या खुणा आहेत, म्हणून त्याला रामगिरी असें नांव पडलें; हा विंध्याद्रि पर्वतमालेपैकीं असून मेखला पर्वताच्या उत्तरेस आहे. येथें रेवानदी उगम पावते. १३. एका वर्षानंतर, (पावसाळ्याच्या सुरवातीस). हें "काले काले" याचें भाषांतर आहे. १४. स्नेहनिदर्शक. १५. पहिल्या पावसाचें पाणी पडल्याबरोबर तापलेल्या डोंगरांतून जी उष्ण वाफ सुटत असते तिचा हा उल्लेख असावा. 'बाष्प' हा शब्द द्व्यर्थी योजिला आहेः-(अ) अश्रू (आ) वाफ. १६. यक्षानी सांगितलेल्या वाटेवर पुष्कळनद्या व पर्वत आहेत, म्हणून ती विशेष सोइवार पडेल.

---

* "तुङ्ग" म्ह० उंच.

( १४ ) अद्रीचें हा शिखर हरितो, काय हो! आजि वारा।
ऐशा भावें तुज चकितशा देखती सिद्धबाला ॥
स्थाना सोडी वरनिचुल[1] या, उत्तरे धांव मार।
दिङ्नागांचे[2] पथिं चुकवुनी चंडशुंडा[3]प्रहार ॥

( १५ ) रत्नें सारीं जणुं वितळुनी ओतिलें रम्य रूप।
वल्मीकाग्रांतुनि वरि उठे, अर्धसें इंद्रचाप ॥
शोभा तेणें, वपु बहु तुझी पाविजे श्यामला जें।
गोपालाची[4] जणुं विनटली मूर्ति बर्हें[5] सतेजें ॥

( १६ ) तूं शेतीचा प्रभव गणुनी, योषिता ग्रामवासी।
प्रेमें पीती नयनिं तुजला, नेणत्या भ्रूविलासीं ॥
सीरोत्क्षेपें नवसुरभिता मालभूमीस वेंघें।
कांहीं मागें वळुनि मग तूं उत्तरे चाल वेगें ॥

( १७ ) दावाग्नीतें शमविसि पुरा वारिवर्षें प्रभूतें।
तेणें श्रांता पथिं तुज शिरीं घेइजे आम्रकूटें ॥
कामा आला प्रथम, करि जो याचना आश्रयाची।
सेवी त्यातें अधमहि; कथा काय हो! उन्नतांची? ॥

---

१. वरनिचुल म्ह० जेथें निचुलांची सर्वोत्कृष्ट झाडें उगवतात अशी जागा; 'निचुल' ही पाण्यांत वाढणारीं वेतासारखी झाडें असावीं. २. "ऐरावतः पुण्डरीको" वगैरे आठ दिग्गज किंवा दिङ्नाग. ३. निचुल व व दिङ्नाग हे दोन प्रसिद्ध विद्वान होऊन गेले, त्यांस उद्देशून हें आहे असें मल्लिनाथ म्हणतो. पण बुद्धमताचा उपदेशक दिङ्नागाचार्य हा इसवी ५–६ शतकांत होऊन गेला; तसेंच निचुल नांवाच्या एका विद्वानानें भोजराजाच्या पदरीं असलेल्या 'कालिदास' नांवाच्या कवीच्या 'नानार्थशब्दरत्न' या ग्रंथावर 'तरला' नांवाची टीका लिहिली आहे. अर्थात, हे तिन्ही इसवी ५–६ शतकांत होऊन गेले असल्यास, इसवी शकाच्या पहिल्या किंवा दुसऱ्या शतकांपूर्वी लिहिलेल्या मेघदूत काव्यांत त्यांचा उल्लेख असणें शक्य नाहीं. मेघदूताचा सर्वांत जुना टीकाकार वल्लभदेव हा आपल्या टीकेंत यासंबंधीं कांहींच उल्लेख करीत नाहीं, ही गोष्टही लक्षांत ठेवण्यासारखी आहे. आम्ही शेवटच्या चरणाचा सरळ अर्थ लक्षांत घेऊन भाषांतर केलें आहे. 'परिह्व' ( परि+ह्व ) म्ह० 'चुकविणें'; 'अवलेप' म्ह० हल्ला ( आपट्यांचा कोश पहा. ) ४. गोपालकृष्णाची; मुळांत "गोपवेषस्य विष्णोः" असें आहे.

**कल्पनासादृश्यः**—चन्द्रकचारुमयूरशिखंडक मण्डलवलयित वेशम् ।
प्रचुरपुरंदरधनुरनुरंजित मेदुरमुदितसुवेशम् ॥ ( गी. गो. सर्ग २. ३ )

५. मोरांच्या पिसांनीं; श्रीकृष्ण आपल्या वेषभूषेंत मयूरपिच्छांचा उपयोग करीत असल्याचें

( १४ ) अद्रेः शृङ्गं हरति पवनः किंस्विदित्युन्मुखीभि-*
§दृष्टोत्साहश्चकितचकितं मुग्धसिद्धाङ्गनाभिः ।
स्थानादस्मात्सरसनिचुलादुत्पतोदङ्मुखः खं
दिङ्नागानां पथि परिहरन्स्थूलहस्तावलेपान् ॥

( १५ ) रत्नच्छायाव्यतिकर इव प्रेक्ष्यमेतत्पुरस्ता-
द्वल्मीकाग्रात्प्रभवति धनुःखण्डमाखण्डलस्य ।
येन श्यामं वपुरतितरां कान्तिमापत्स्यते ते
बर्हेणेव स्फुरितरुचिना गोपवेषस्य विष्णोः ॥

( १६ ) त्वय्यायत्तं कृषिफलमिति भ्रूविलासानभिज्ञैः
प्रीतिस्निग्धैर्जनपदवधूलोचनैः पीयमानः ।
सद्यः सीरोत्कषणसुरभि क्षेत्रमारुह्य मालं
किंचित्पश्चाद्व्रज लघुगतिर्भूय एवोत्तरेण ॥

( १७ ) त्वामासारप्रशमितवनोपप्लवं साधु मूर्ध्ना
वक्ष्यत्यध्वश्रमपरिगतं सानुमानाम्रकूटः ।
न क्षुद्रोऽपि प्रथमसुकृतापेक्षया संश्रयाय
प्राप्ते मित्रे भवति विमुखः किं पुनर्यस्तथोच्चैः ॥

मिश्रुन आहे. मोरपिसांत इन्द्रधनुष्यासारखे अनेक रंग असतात, व मेघ रंगानें श्यामवर्ण असतो: म्हणून, इन्द्रधनुष्यानें भूषित मेघ, मयूरपिच्छधारी कृष्णासारखा दिसेल.

६. सीरोत्क्षेप म्ह० नांगरणें: 'नवसुरभिना' म्ह० नवीन सुवास असलेली. नांगरल्यामुळें नवीन सुवास सुटला आहे, अशी. ७. मालक्षेत्र: विल्सनच्या मतें हें 'मालडा' शहर असावें: कांहीं विद्वान हें यवतमाळ असावें असें म्हणतात. ८. मुळांत "पश्चात्" आहे, त्याचें हें भाषान्तर आहे. "पश्चात्" या शब्दाचें मल्लिनाथानें केलेलें विवरण पहा. परस्त्रीरूप मालक्षेत्राचा उपभोग घेतल्यानंतर, लोकापवादनिवारणार्थ, सरळ पुढें न जातां जरा आडवळण घेऊन जा, असें यक्ष मेघास सांगत आहे. ९. ( वृष्टि झाल्यामुळें ) द्रुत-गति होऊन; " निर्वृष्टत्वात् क्षिप्रगमनः " ( मल्लिनाथ ). १०. वारिवर्षे म्ह० पाण्याच्या वर्षावानें 'प्रभूतें' म्ह० पुष्कळ. ११. अमरकंटकानें: हें नांव 'आम्रकूट' शब्दाचा अपभ्रंश आहे; हा विंध्याद्रीच्या पूर्वेस आहे; येथें नर्मदेचा उगम आहे. १२. उन्नत म्ह० श्रेष्ठ किंवा उंच.

**कल्पनासादृश्यः**—दिवाकराद्रक्षति यो गुहासु लीनं दिवाभीतमिवांधकारम् ।
क्षुद्रेऽपि नूनं शरणं प्रपन्ने ममत्वमुच्चैःशिरसां अतीव ॥ (कु. सं. १.१२).

* " उन्मुखीभिः " म्ह० वर चेहरे करून.

§ " दृष्टोत्साहः " म्ह० ज्याचें गगनोत्पतन ( स्त्रिया ) निरखून पहात आहेत असा.

(१८) त्याचीं पोर्श्वें, परिणतफला पीतशी आंबराई ।
झांकी; मूर्ती शिखरिं विलसे श्यामला जों तुझी ही ॥
शोभा तेव्हां अमरमिथुनीं कौतुकें, बा ! पहावी ।
भूदेवीचा स्तन मधिं निळा, बाजुनीं गौर जेवीं ॥

(१९) राहें कुंजीं, विहरति जिथें भिल्लिणी, तूं जरासा ।
वृष्टीनें हो द्रुतगति; पुढें तोडितां मार्ग साचा ॥
रेवा लोळे उपलविषमीं विंध्यपादीं पहासी ।
कीं काढली गजतनुवरी रंगवल्लीच खाशी ॥

(२०) तीचें पाणी, वनगजमदें उग्र जें दर्प घेई ।
जंबूकुंजाकुल, करुनियां वृष्टि, घेवोनि जाई ॥
अंतःसारा ! तुज बुझाविण्या, गा ! शकेनाचि वारा ।
रिक्तांतें ये लघुंपण, वरी पूर्णतां गौरवाला ॥

(२१) 'नीपें झालीं शबल, बघुनी, कोंवळ्या केसरांनीं ।
ओल्या जागीं प्रथम फुलल्या रानकेळी खुंडोनी ॥
तैसा माळावरि बहलसा गंध घेतां धरेचा ।
सारंगां त्वत्पथ, नवजलें सिक्त, हो ज्ञात साचा ॥

(२२) वाटे घाई जरि तुज असे जावयाची मदर्थ ।
होई कालव्यय सुकुटजीं पर्वतापर्वतांत ॥
केकानादें, सजलनयनीं, स्वागता सिद्ध, भावें ।
त्या मोरांही अवगणुनियां, शीघ्र जाया निघावें ॥

---

१. पर्वताच्या बाजू. २. मुळांत "स्निग्धवेणीसमा" म्ह. काळ्याभोर वेणीसारखा असा शब्दप्रयोग आहे; पिकलेल्या आंब्यांमुळें पिंवळ्या दिसणाऱ्या पर्वताच्या बाजू, व त्यांवर असलेला स्त्रीच्या काळ्याभोर वेणीसारखा मेघ, यांचें, व मधें नीलवर्ण असलेल्या स्त्रीच्या गौर स्तनाचें साम्य दर्शविलें आहे. ३. पर्वत हा जणुं भूदेवीचा स्तन आहे, अशी कल्पना. ४. हें नर्मदा नदीचें दुसरें नांव आहे. ५. मोठमोठे दगड असल्यामुळें उंचसखल असा; 'उपल' म्ह० दगड; 'विषम' म्ह० उंचसखल; असा विन्ध्याद्रीच्या पायथ्याचा प्रदेश. ६. विंध्यपर्वत हत्तींचें उत्पत्तिस्थान आहेः—"हिमवद्विंध्यमलया गजानां प्रभवाः।" (मल्लिनाथ). ७. जांभळीच्या झाडांनीं ज्या पाण्याचा वेग जागोजाग अडविला गेला आहे, असें. ८. या शब्दप्रयोगांत 'सार' या शब्दावर श्लेष आहे; "सार" म्ह० (१) पाणी; (२) सामर्थ्य, किंवा द्रव्य. ९. (आंखलेल्या मार्गावरून) जबरीनें दूर ओढून नेण्यास. १०. 'रिक्त' म्ह० रिकामे; किंवा संपत्तिहीन. 'लघुपण' म्ह० हलकेपणा किंवा कमीपणा. 'गौरव' म्ह० आदर किंवा मोठेपणा; 'पूर्णता' म्ह०

(१८) छन्नोपान्तः परिणतफलद्योतिभिः काननाम्रै-
स्त्वय्यारूढे शिखरमचलः स्निग्धवेणीसवर्णे ।
*नूनं यास्यत्यमरमिथुनप्रेक्षणीयामवस्थां
मध्ये श्यामः स्तन इव भुवः शेषविस्तारपाण्डुः ॥

(१९) स्थित्वा तस्मिन्वनचरवधूभुक्तकुञ्जे मुहूर्तं
तोयोत्सर्गद्रुततरगतिस्तत्परं वर्त्म तीर्णः ।
रेवां द्रक्ष्यस्युपलविषमे विन्ध्यपादे विशीर्णां
भक्तिच्छेदैरिव विरचितां भूतिमङ्गे गजस्य ॥

(२०) तस्यास्तिक्तैर्वनगजमदैर्वासितं वान्तवृष्टि-
र्जम्बूकुञ्जप्रतिहतरयं तोयमादाय गच्छेः ।
अन्तःसारं घन तुलयितुं नानिलः शक्ष्यति त्वां
रिक्तः सर्वो भवति हि लघुः पूर्णता गौरवाय ॥

(२१) नीपं दृष्ट्वा हरितकपिशं केसरैरर्धरूढै-
राविर्भूतप्रथममुकुलाः कन्दलीश्चानुकच्छम् ।
जग्ध्वारण्येष्वधिकसुरभिं गन्धमाघ्राय चोर्व्याः
सारङ्गास्ते जललवमुचः सूचयिष्यन्ति मार्गम् ॥

(२२) उत्पश्यामि द्रुतमपि सखे मत्प्रियार्थं यियासोः
कालक्षेपं ककुभसुरभौ पर्वते पर्वते ते ।
शुक्लापाङ्गैः सजलनयनैः स्वागतीकृत्य केकाः
प्रत्युद्यातः कथमपि भवान्गन्तुमाशु व्यवस्येत् ॥

---

श्रीमंती किंवा भरीवपणा. ११. कदंबवृक्षाचीं फुलें. मुळांत "नीपं" असा एकवचनी शब्दप्रयोग आहे. तो जातिवाचक असल्यामुळें, भाषांतरांत अनेकवचनाचा उपयोग केला आहे. १२. नाना रंगांचीं; मूळ श्लोकांत वापरलेल्या "हरितकपिशं" या शब्दप्रयोगानें मुख्यत्वेंकरून पिंवळा, लाल, व श्याम अशा तीन रंगांचा बोध होतो, बारकाईनें पाहिल्यास कदंबवृक्षाच्या अर्धस्फुट कळ्यांत आणखींही एक दोन रंगांची पुसट छटा दिसते; म्हणून भाषांतरांत 'शबल' म्ह० नाना रंगांचीं हा शब्द वापरला आहे. १३. अर्धस्फुट. १४. 'केसर' म्ह० तंतु. १५. फुलल्या म्ह० फुललेल्या; कळ्या आलेल्या. १६. पळतांपळतां घाईनें रानकेळींचे कोंब पटापट तोडून खाण्याची क्रिया दर्शविण्यासाठीं हा शब्द योजिला आहे. १७. जोरकस; घ्राणेन्द्रियास सहज अवगत होणारा. १८. 'सारंग' या शब्दाचे चार अर्थ होतातः—(१) भ्रमर (२) हरिण (३) चातक (४) हत्ती. प्रत्येक ओळीबरोबर जो अर्थ सयुक्तिक दिसेल तो त्या त्या ओळींत टीकाकारांनीं घेतला आहे.

---

* "नूनं" म्ह० खरोखर.

( १३ ) उद्यानांच्या वइ, तव दिनीं, पांडुरा केतकांनीं ।
चैत्यें[2] सारीं घरटिं करुनी व्यापिलीं वायसांनीं ॥
रानें जेथें करिति पिकल्या जांभळी श्यामवर्ण ।
हंसां थोडी[3] वसति जिकडे, होति ऐसे दशार्ण[4] ॥

( १४ ) जातां, लोकीं प्रथित, विदिशा[5] राजधानी तयांची ।
लाधे तूतें, परिणति[6] परा, बा ! विलासीपणाची ॥
तीरीं वीचिध्वनिमुखर[7] जें, चंचलभ्रू[8] तरंगीं ।
प्यावें वेत्रा[9]-जल मधु, तिचें आस्य[10] कीं, प्रेमरंगीं ॥

( १५ ) नीचैर्नामा[11] गिरिवरि वसें; कांहिं विश्रांति चाखीं ।
[12]जो कोंबवीं[13] पुलकित तव स्पर्शनें जाहला कीं ॥
जेथें वेश्यारतिपरिमळें व्यापिल्या[14] कंदरांनीं[15] ।
चंडोद्दामें[16] प्रकटिलिं निजें यौवनें नागरांनीं ॥

( १६ ) वर्षा[17] जातां पथिं नवजलें, घेउनी विश्रमास ।
तीरोद्यानीं वनतटिनिच्या, यूथिकाजालकांस[18] ॥
गंडस्वेदा[19] पुसुनि कमलें कर्णिचीं म्लान होती ।
छायादानें क्षणचि सुखवी माळिणींचीं मुखें तीं ॥

( १७ ) घ्यावा लागे, त्यजुनि [1]उदिची, वांकुडा मार्ग तूतें ।
प्रासादांचा विसर न तरी उज्जनीच्या पडो वे ॥
विद्युत्तेजें पुररमणिचे नेत्र [2]भेणें विलोल ।
त्यांहीं तेथें जरि न रमसी, बा ! तुझा जन्म फोल ॥

१. कुंपणें; 'वइ' हा शब्द बहुधा कोंकणांत वापरतात. २. टीकाकारांनीं या शब्दाचे दोन अर्थ केले आहेत (अ) बुद्धालयें; कालिदास हा अग्निमित्राचा आश्रित व पुष्पमित्राचा समकालीन मानिल्यास हा अर्थ संभवनीय दिसतो. बुद्धधर्माचा पाडाव करण्याचा पुष्पमित्रानें भगीरथ यत्न केला; त्यामुळें बुद्धालयें ओसाड पडून त्यांत कावळ्यांनीं घरटीं केलीं असतील. (आ) दुसरा अर्थ—वड, पिंपळ वगैरे चवाठ्यावरील वृक्ष. हा अर्थ विशेष संभवनीय दिसतो. ३. पावसाळा जवळ आल्यामुळें, हंस दशार्णांत थोडी वस्ती करून मानस सरोवरीं जाण्याची तयारी करितात. ४. 'दशार्ण' म्ह० दहा, ऋण म्ह० किल्ले किंवा नद्या आहेत, असा प्रदेश. हा हल्लींचा छत्तीसगड असावा. कांहीं विद्वानांच्या मतें हा भेलसा प्रांत असावा. ५. हें हल्लींचें भेलसा शहर असावें; याचें बाणाच्या कादंबरींतही वर्णन आहे. ६. पराकाष्ठेचें, सर्वोत्कृष्ट फळ. ७. तीरावरील लाटांनीं केलेल्या नादामुळें बोलकें. कवीनें या नादाला प्रणयिनीनें प्रथम चुंबनाच्या वेळीं योजलेल्या प्रतिषेधात्मक शब्दांची उपमा दिली आहे.

**कल्पनासादृश्यः**—"प्रतिषेधाक्षरविक्लवाभिरामम्" (शा. ३.२२).



विद्युत्तेजें पुररमणिंचे नेत्र भेणें विलोल।
त्यांहीं तेथें जरि न रमसी, बा ! तुझा जन्म फोल॥

पृ. १२.

श्लोक २७ पहा.

( २३ ) पाण्डुच्छायोपवनवृतयः केतकैः §सूचिभिन्नै-
नींडारम्भैर्गृहबलिभुजामाकुलग्रामचैत्याः ।
त्वय्यासन्ने परिणतफलश्यामजम्बूवनान्ताः
संपत्स्यन्ते कतिपयदिनस्थायिहंसा दशार्णाः ॥

( २४ ) तेषां दिक्षु प्रथितविदिशालक्षणां राजधानीं
गत्वा सद्यः $फलमविकलं कामुकत्वस्य लब्धा ।
तीरोपान्तस्तनितसुभगं पास्यसि स्वादु यस्मा-
त्सभ्रूभङ्गं मुखमिव पयो वेत्रवत्याश्चलोर्मि ॥

( २५ ) नीचैराख्यं गिरिमधिवसेस्तत्र विश्रामहेतो-
स्त्वत्संपर्कात्पुलकितमिव *प्रौढपुष्पैः कदम्बैः ।
यः पण्यस्त्रीरतिपरिमलोद्गारिभिर्नागराणा-
मुद्दामानि प्रथयति शिलावेश्मभिर्यौवनानि ॥

( २६ ) विश्रान्तः सन्व्रज वननदीतीरजातानि सिञ्च-
न्नुद्यानानां नवजलकणैर्यूथिकाजालकानि ।
गण्डस्वेदापनयनरुजाक्लान्तकर्णोत्पलानां
छायादानात्क्षणपरिचितः पुष्पलावीमुखानाम् ॥

( २७ ) वक्रः पन्था यदपि भवतः प्रस्थितस्योत्तराशां
सौधोत्सङ्गप्रणयविमुखो मा स्म भूरुज्जयिन्याः ।
विद्युद्दामस्फुरितचकितैस्तत्र पौराङ्गनानां
लोलापाङ्गैर्यदि न रमसे लोचनैर्वञ्चितोऽसि ॥

---

८. तरंगांच्या योगानें जिचे भ्रू-विलास सुरू आहेत असा भास होतो, अशी.

**कल्पनासादृश्यः**—तरंगभ्रूभङ्गाक्षुभितविहगश्रेणिरशना ( विक्रमो. ४.५२ ).

९. वेत्रावती नदीचें पाणी: ( हेंच जणुं तिचें मुख ). ही नदी सध्यां 'बटवा' या नांवानें ओळखली जाते. १०. आस्य म्ह० तोंड, मुख. ११. विदिशा नगरीजवळ असलेला एक पर्वत; कांहीं टीकाकार यास 'वामनगिरी' म्हणतात. १२. 'जो' म्ह० जो नीचैः पर्वत. १३. कदंब पुष्पांमुळें. १४. व्यापिल्या म्ह० व्यापिलेल्या: भरून गेलेल्या. १५. कंदर म्ह० गुहा: रतिपरिमळानें व्यापिलेल्या गुहांमुळें यौवनांची प्रतीति येते. १६. बेफाम; अमर्याद.

**कल्पनासादृश्यः**—माल्यामोदी मुहुरुपचितस्फीतकर्पूरवासो ।
वातो यूनामभिमतवधूसन्निधानं व्यनक्ति ॥ ( मा. मा. ७.५ ).

१७. जुईच्या कळ्या: येथें "रेतः सिक्त्वा कुमारीषु" ही कल्पना ध्वनित आहे (मल्लिनाथ).
१८. गालावरील घाम. १९. उत्तर दिशा. २०. भयानें.

---

§ "सूचिभिन्नैः" म्ह० उमललेल्या; $ "सद्यः" म्ह० ताबडतोब; * "प्रौढ" म्ह० फुललेली.

( २८ ) वीचिक्षोभें मुखरविहगश्रेणि कांचीच शोभे ।
जीची; दावी, स्खलितगति जी, नाभि आवर्तरूपें ॥
निर्विंध्येचा, पथिं उतरुनी, तूं रसास्वाद घेच ।
वामा प्रेमा प्रकट करिती स्वप्रियीं विभ्रमेंच ॥

( २९ ) वेणीजैसी तनुर्सलिल जी, तूं दुरावोनि झाली ।
जीर्णें पर्णें तटिं गळुनियां, पांडुता जीस आली ॥
तूझें, ऐसी विरहविधुरा, थोर सौभाग्य दावी ।
जेणें वृद्धी वरिल सरिता, ती कृती त्वां करावी ॥

( ३० ) गांवोगांवीं जरठ कथिती वत्सलीला, अवंती ।
ऐसा येतां, विपुलविभवा गांठिं तूं उज्जनी ती ॥
जों लोपूं ये सुकृतनिधि कीं स्वर्गवासीजनांचा ।
शेषें पुण्यें धरणिं हरिला दिव्य तद्भाग साचा ॥

( ३१ ) जो हंसांचीं श्रवणमधुरें कूजितें दूर नेई ।
प्रातःकालीं विकचकमलां सेवुनी गंधवाही ॥
शीतस्पर्शें हरित सुरतग्लानि जेथें स्त्रियांची ।
शिप्रावात, प्रियतम करी की रतिप्रार्थनाची ॥

---

१. किलबिलाट करणाऱ्या पक्ष्यांची रांग.

**कल्पनासादृश्यः**— " तरंगभ्रूभङ्गाक्षुभितविहगश्रेणिरशना " ( विक्रमो. ४·५२ ). २. कमरपट्टा किंवा रशना ३. अडखळणारी गति आहे जिची. ४. भोंवऱ्याच्या रूपानें. ५. हें " सन्निपत्य " या शब्दाचें भाषांतर आहे; ' अडवून ', किंवा ' हल्ला करून ' असें भाषांतर आमच्या मतें बरोबर नाहीं. ६. सुंदर व मानी स्त्रिया. ७. विलासांनीं; शृंगारचेष्टा करून. कामशास्त्रांत या चेष्टांचें असें मनोहर वर्णन आहेः—

> स्निग्धं दृष्टिपथं विभूषिततनुः कर्णस्य कंडूयनम् ।
> नाभेर्दर्शनमुत्पथं च गमनं बालस्य चालिङ्गनम् ॥
> केशानां च मुहुर्मुहुर्विवरणं वार्ता च सख्या सह ।
> कुर्युः प्रीतिवशात् स्त्रियः समदना दृष्ट्वा नरं वांछितम् ॥ ( वल्लभदेवाची टीका ).

८. जींत थोडें पाणी शिल्लक राहिल्यामुळें, जी स्त्रीच्या वेणीप्रमाणें बारीक दिसत आहे. ९. सुंदर व नवयौवना स्त्री झुरणीस लागून विरहानें बारीक होणें, हें पुरुषाचें 'सौभाग्य' समजतात. १०. **कल्पनासादृश्यः**—" असंभोगो जरा स्त्रीणां " ( सु. र. भां. पृ. १६१ श्लो. ८२ ). ११. वत्सराज किंवा उदयन हा चंद्रवंशांतील सहस्रानीक राजाचा पुत्र होता.

( २८ ) वीचिक्षोभस्तनितविहगश्रेणिकाञ्चीगुणायाः
संसर्पन्त्याः स्खलितसुभगं दर्शितावर्तनाभेः ।
निर्विन्ध्यायाः पथि भव रसाभ्यन्तरः सन्निपत्य
स्त्रीणामाद्यं प्रणयवचनं विभ्रमो हि प्रियेषु ॥

( २९ ) वेणीभूतप्रतनुसलिला सा त्वतीतस्य सिन्धुः
पाण्डुच्छाया *तटरुहतरुभ्रंशिभिर्जीर्णपर्णैः ।
सौभाग्यं ते सुभग विरहावस्थया व्यञ्जयन्ती
कार्श्यं येन त्यजति विधिना स त्वयैवोपपाद्यः ॥

( ३० ) प्राप्यावन्तीनुदयनकथाकोविदग्रामवृद्धा-
न्पूर्वोद्दिष्टामनुसर पुरीं श्रीविशालां विशालाम् ।
स्वल्पीभूते सुचरितफले स्वर्गिणां गां गतानां
शेषैः पुण्यैर्हृतमिव दिवः कान्तिमत्खण्डमेकम् ॥

( ३१ ) दीर्घीकुर्वन्पटु मदकलं कूजितं सारसानां
प्रत्यूषेषु स्फुटितकमलामोदमैत्रीकषायः ।
यत्र स्त्रीणां हरति सुरतग्लानिमङ्गानुकूलः
शिप्रावातः प्रियतम इव प्रार्थनाचाटुकारः ॥

---

त्याची राजधानी कौशांबी होती. महासेन किंवा प्रद्योत, उज्जयिनीचा राजा, याची वासवदत्ता नामक कन्या संजय नांवाच्या राजाला देऊं केली होती, तिचें वत्सराजानें तिच्या इच्छेनुसार हरण केलें. १२. अवंती हा देश आहे; हा हल्लींचा माळवा होय. १३. जिचा मागें उल्लेख आला आहे ( श्लो.२७ ) १४. दिव्य म्ह० दैदीप्यमान; 'तद्भाग' म्ह० त्या (स्वर्गा)चा भाग. पुण्य क्षीण झाल्यामुळें, " क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति " या न्यायानें पृथ्वीवर परत येणाऱ्या स्वर्गवासी लोकांनीं, शिल्लक राहिलेल्या पुण्यानें उज्जयिनी हा स्वर्गाचा भाग पृथ्वीवर आणिला, अशी कल्पना आहे. या वर्णनावरून कालिदासाचें उज्जयिनीवरील प्रेम व्यक्त होतें; व तो विक्रमादित्याचा आश्रित होता या मतास कांहींशी पुष्टि मिळते. १५. फुललेलीं कमळें; उज्जयिनींत बंदीजनांप्रमाणें सारसपक्षी तारमधुर शब्दांनीं पौरजनांस पहांटेस उठवीत असत, व कमलस्पर्शानें 'गंधवाही' म्ह० सुगंधित झालेला शिप्रानदीवरून येणारा शीतल वायू त्यांस आल्हादित करित असे, असा भावार्थ आहे. १६. 'शिप्रावात' म्ह० शिप्रानदीवरून येणारा वारा.

**कल्पनासादृश्य:**—अनेन यूना सह पार्थिवेन रम्भोरु कच्चिन्मनसो रुचिस्ते ।
शिप्रातरङ्गानिलकंपितासु विहर्तुमुद्यानपरंपरासु ॥ ( रघु. ६.३५ ).

---

* " तटरुहतरुभ्रंशिभिः " म्ह० कांठावरील झाडांवरून गळून पडलेल्या.

३२ ) पुष्टी घेई विवरेंनिसृतें केशसंस्कारधूपें ।
बंधुस्नेहें तुज गृहशिखी पूजिती नृत्यरूपें ॥
सौधीं तीच्या सुरभिसुमनीं अध्वखेदासि नाशीं ।
शोभा त्यांची बघत ललनापादरागांकितांची ॥

( ३३ ) स्वामीकंठासम, गण, तुला, आदरानें पहाती ।
जाई जेथें त्रिभुवननुता ईशमूर्ती असे ती ॥
पद्मस्पर्शें, मुदितवनितामज्जनें, वात नित्य ।
गंधोद्वारी, उपवन जिथें डोलवी, गांधवंत्य ॥

( ३४ ) अन्येकालीं, जलधर ! महाकालभूमीस जासी ।
राहें तेथें तरि, रवि न जों जाय अस्ताचलासी ॥
व्हावें सन्ध्याबलिसमयिंचा दुंदुभी तूं अमोल ।
तूतें मोठें फल मधुरशा गर्जितांचें मिळेल ॥

( ३५ ) नृत्यें ज्यांच्या मुखर रशना: कोंदिल्या रत्नजातें ।
ढाळोनी ज्या, कनकवलिंच्या, शीणल्या, चामरांतें ॥
तूझ्या, पावां सुखद, पहिल्या, पावुनी प्रोक्षणाला ।
वेश्या तूतें वितरिति अलिश्रेणिशा वीक्षणांला ॥

( ३६ ) तेथें वृक्षांवरि भुजजशा, मंडलें तूं स्थिरावें ।
संध्यारागा तदुपरि जपापुष्परक्ता वरावें ॥
ओलें नागांबर जणुं; असा तूं स्मरारीस सर्वां ।
नृत्यारंभीं, गतभयचि या पाहि भक्तीस देवी ॥

---

१. खिडकीवाटे बाहेर पडणाऱ्या. २. केंस वाळवून सुगंधित करण्यासाठीं योजलेल्या धूपानें. **कल्पनासादृश्य:**—“ धूपोष्मणा त्याजितमार्द्रभावं केशान्तमन्तःकुसुमं तदीयम् ।
( कु. सं. ७. १४ ).

३. सुगंधित फुलांनीं भरलेल्या. ४. मार्ग आक्रमण्याचे श्रम. ५. तरुणींनी पायांना लाविलेल्या अळित्याचे छाप जेथें दृग्गोचर होतात अशीं मंदिरें. ६. तूं नीलवर्ण असल्यामुळें, तुला पाहून शिवगणांना आपला स्वामी जो शंकर त्याच्या (नील) कण्ठाचा भास होईल. ७. तीन्ही लोक ( स्वर्ग, मृत्यु, पाताल ) जिची स्तुति करितात, अशी महाकालेश्वराची मूर्ति. ८. आनंदी व खेळकर वृत्तीच्या स्त्रियांच्या स्नानानें ( गंधोद्वारी ). ९. सुवासयुक्त. १०. गंधवती नदीचें; ( उपवन ). ११. अन्येकालीं, म्ह० संध्याकालाशिवाय इतर कोणत्याहि वेळीं गेलास, तर संध्याकाल होईपर्यंत उज्जयिनींत, माझा निरोप पोहोंचविण्याची अत्यंत निकड असतांही, ईश्वरपूजनाप्रीत्यर्थ रहा; व संध्याकाळच्या आरतीच्या वेळीं, गर्जना करून, दुंदुभी-रूप हो. १२. उज्जयिनींत महाकाल शंकराचें फार जुनें व प्रसिद्ध मंदिर आहे, म्हणून तिला ‘ महाकालभूमि ’ असें म्हणतात. त्याचा रघुवंशांतही उल्लेख आहे:—

( ३२ ) जालोद्गीर्णैरुपचितवपुः केशसंस्कारधूपै-
र्बन्धुप्रीत्या भवनशिखिभिर्दत्तनृत्योपहारः ।
हर्म्येष्वस्याः कुसुमसुरभिष्वध्वखेदं नयेथा
लक्ष्मीं पश्यंल्ललितवनितापादरागाङ्कितेषु ॥

( ३३ ) भर्तुः कण्ठच्छविरिति गणैः सादरं वीक्ष्यमाणः
पुण्यं यायास्त्रिभुवनगुरोर्धाम चण्डीश्वरस्य ।
धूतोद्यानं कुवलयरजोगन्धिभिर्गन्धवत्या-
स्तोयक्रीडानिरतयुवतिस्नानतिक्तैर्मरुद्भिः ॥

( ३४ ) अप्यन्यस्मिञ्जलधर महाकालमासाद्य काले
स्थातव्यं ते नयनविषयं यावदत्येति भानुः।
कुर्वन्संध्याबलिपटहतां *शूलिनः श्लाघनीया-
मामन्द्राणां फलमविकलं लप्स्यसे गर्जितानाम् ॥

( ३५ ) पादन्यासैः क्वणितरशनास्तत्र लीलावधूतै
रत्नच्छायाखचितवलिभिश्चामरैः क्लान्तहस्ताः ।
वेश्यास्त्वत्तो $नखपदसुखान्प्राप्य वर्षाग्रबिन्दू-
नामोक्ष्यन्ते त्वयि मधुकरश्रेणिदीर्घान्कटाक्षान् ॥

( ३६ ) ‡ पश्चादुच्चैर्भुजतरुवनं मण्डलेनाभिलीनः
सान्ध्यं तेजः प्रतिनवजपापुष्परक्तं दधानः ।
नृत्यारम्भे हर पशुपतेरार्द्रनागाजिनेच्छां
शान्तोद्वेगस्तिमितनयनं§ दृष्टभक्तिर्भवान्या ॥

---

असौ महाकालनिकेतनस्य वसन्नदूरे किल चंद्रमौलेः ।
तमिस्रपक्षेऽपि सह प्रियाभिर्ज्योत्स्नावतो निर्विशति प्रदोषान् ॥ ( रघु. ६.३४ ).

१३. नादयुक्त. १४. कमरपट्टे; जे नाचामुळें नादयुक्त होतात. १५. कोंदण केलेल्या; खचिलेल्या. १६. जात म्ह० समुच्चय; रत्न-समुच्चयानें कोंदिलेले दांडे ( वलि ). अन्वयः—" रत्न-जातें कोंदिल्या, कनकवलिंच्या, चामरांतें ढाळोनी ज्या शीणल्या ". १७. वलि म्ह० दांडे; ज्यांचे दांडे सुवर्णयुक्त आहेत अशीं. " रत्नच्छायाखचितवलिभिः" याचा अर्थ कांहीं टीकाकार, " रत्नांच्या तेजानें ज्यांची वली (त्रिवली) स्पष्ट दिसत आहे", असा करितात; पण तो दूराकृष्ट व अप्रयोजक दिसतो. १८. सिंचन; ( पावसाच्या पाण्याचें ). पहिलें, पायांना सुख देणारें, सिंचन मिळून सुखी झाल्यामुळें. १९. भ्रमरांच्या रांगांप्रमाणें दीर्घ व काळे भोर. २०. कटाक्षक्षेप.

**कल्पनासादृश्यः**—विलोलनेत्रभ्रमरैर्गवाक्षाः सहस्रपत्राभरणा इवासन् ॥ ( रघु. ७.११ ). २१. 'मंडलें' म्ह० मंडलाकार धारण करून. २२ जास्वंदीच्या फुलांप्रमाणें लाल. २३. 'नागांबर' म्ह० हत्तीचें चामडें. मोठमोठालीं झाडें जणुं काय शंकराचे वर उभारलेले अनेक हात;

---

* शंकराच्या. $ नखक्षतांना सुखकर वाटणारें ‡ त्या नंतर § निश्चल दृष्टीनें.

( ३७ ) जाती तेथें प्रियतमगृहा योषिंता रात्रिकालीं ।
जेव्हां ध्वान्त प्रबल, पडदा राजमार्गासि घाली ॥
दावाया त्यां सुपंथ चपलादीपिका पाजळावी ।
वृष्टीनें वा गडगडुनियां त्यां न तूं भेडसावीं ॥

( ३८ ) घेती कोण्या भवनशिखरीं पारवे झोंप जेथें ।
राहें रात्रौ, चिरविलसनें शीण, विद्युत् प्रियेतें ॥
येतां; सूर्योदयिं मग पुढें लाग मार्गासि, आर्या ! ।
तो कालातें नच दवडि, जो घे शिरीं मित्रकार्या ॥

( ३९ ) ऐशा वेळीं, प्रियतम-करें खण्डितांच्या पुसावें ।
दुःखाश्रूंतें; म्हणुनि झणिं तूं भानुमार्गा त्यजावें ॥
प्रालेयास्त्रें कमलमुखिचीं टाकण्यां हा पुसोनी ।
येई; त्याचे कर अडवितां फार कोपेल मानी ॥

( ४० ) गंभीरेचें पय, जणुं तिचें चित्त शुद्ध प्रशान्त ।
छायायोगेंहि तुज, सुभगा ! स्थान लाभे तयांत ॥
तेव्हां तीच्या चपलविचलन्मीनशा प्रेक्षितांतें ।
सन्मानावें कुमुदविशदां, सोडुनी मीपणातें ॥

---

त्यांवर, मंडलाकार धारण करून, तूं स्थिर झाल्यावर, संध्याकालीन, जास्वंदीच्या फुलांसारखा लाल रक्तिमा धारण केलास, म्हणजे शंकरानें गजासुरास मारून त्याचें रक्तानें माखलेलें लाल चामडें अनेक हातांवर घेतल्याचा भास होईल. हा निव्वळ भास असल्यामुळें पार्वती त्याला न घाबरतां कौतुकानें पाहील.

१. योषिता म्ह० स्त्रिया. २. काळोख. ३. सुपथ म्ह० खांचा खळगे नसलेले रस्ते. ४. विजेची दिवटी.

**कल्पनासादृश्यः**—( अ ) रजनीतिमिरावगुण्ठिते पुरमार्गे घनशब्दविक्लवाः ।
वसतिं प्रिय कामिनां प्रियास्त्वदृते प्रापयितुं क ईश्वरः ॥
(कु. सं. ४. ११).

(आ) सुतीक्ष्णमुच्चैर्ध्वनतां पयोमुचां घनान्धकारीकृतशर्वरीष्वपि ।
तडित्प्रभादर्शितमार्गभूमयः प्रयान्ति रागादभिसारिकाः स्त्रियः ॥
( ऋ. सं. ३. १० ).

५. (अ) दीर्घविलास केल्यामुळें; (आ) बराच वेळ स्फुरण पावल्यामुळें. ६. काव्यशास्त्रांत अठा

( ३७ ) गच्छन्तीनां रमणवसतिं योषितां तत्र नक्तं
रुद्धालोके नरपतिपथे सूचिभेद्यैस्तमोभिः ।
सौदामन्या *कनकनिकषस्निग्धया दर्शयोर्वीं
तोयोत्सर्गस्तनितमुखरो मा स्म भूर्विक्लवास्ताः ॥

( ३८ ) तां कस्यांचिद्भवनवलभौ सुप्तपारावतायां
नीत्वा रात्रिं चिरविलसनात्खिन्नविद्युत्कलत्रः ।
दृष्टे सूर्ये पुनरपि भवान्वाहयेदध्वशेषं
मन्दायन्ते न §खलु सुहृदामभ्युपेतार्थकृत्याः ॥

( ३९ ) तस्मिन्काले नयनसलिलं योषितां खण्डितानां
शान्तिं नेयं प्रणयिभिरतो वर्त्म भानोस्त्यजाशु ।
प्रालेयास्रं कमलवदनात्सोऽपि हर्तुं नलिन्याः
प्रत्यावृत्तस्त्वयि कररुधि स्यादनल्पाभ्यसूयः ॥

( ४० ) गम्भीरायाः पयसि सरितश्चेतसीव प्रसन्ने
छायात्मापि प्रकृतिसुभगो लप्स्यते ते प्रवेशम् ।
तस्मादस्याः कुमुदविशदान्यर्हसि त्वं न धैर्या-
न्मोघीकर्तुं चटुलशफरोद्वर्तनप्रेक्षितानि ॥

---

नायिका सांगितल्या आहेतः—( १ ) स्वाधीनपतिका ( २ ) खण्डिता ( ३ ) अभिसारिका ( ४ ) कलहांतरिता ( ५ ) विप्रलब्धा ( ६ ) प्रोषितभर्तृका ( ७ ) वासकसज्जा आणि ( ८ ) विरहोत्कंठिता अथवा उत्का; पैकीं खंडिता अशी वर्णिली आहेः—

निद्राकषायमुकुलीकृतताम्रनेत्रो । नारीनखव्रणविशेषविचित्रितांगः ॥
यस्याः कुतोऽपिगृहमेति पतिः प्रभाते । सा खंडितेति कथिता कविभिः पुराणैः ॥
( सु. र. भा. पृ. ३७२ ).

७. हिमरूप अश्रू. ८. कमलासारखें मुख, किंवा कमल हेंच मुख. ९. 'कर' म्ह० ( १ ) हात ( २ ) किरण. १०. स्वभावतःच चपल, व वेगामुळें विचलत् म्ह० गोलांट्या घेत असलेल्या माशासारखे; गोलांट्या घेत असलेले मासे हेच जणुं गंभीरानदीचे कटाक्ष किंवा प्रेक्षितें. ११. शुभ्रकमलांप्रमाणें तेजस्वी.

---

* कनकनिकषस्निग्धया म्ह० कसाच्या दगडावर ओढलेल्या सुवर्णरेषेप्रमाणें तेजस्वी.
§ 'खलु' म्ह० खरोखर.

४१ ) फेडीं तीचें, हलु धरियलें, वेतसांच्या[1] करांनीं ।
नीळें तोयांबर निसटलें तीरजंघांवरोनी[2] ॥
होसी जेव्हां स्थिर तिजवरी, मित्र ! कष्टेंचि जासी ।
सोडोनीयां विवृतजघना, कोण जाई विलासी ? ॥

( ४२ ) धाली[3] धात्री नवजलकणें, घे तिच्या सौरभाला ।
शुंडाग्रांनीं कलरवें[4] सवें पीति दंती[5] जयाला ॥
वारा देवाद्रिस[6] तुज असा, प्रेरि[7], बा ! सावकाश ।
शीतस्पर्शें पिकवि वनिं जो उंबरांच्या फलांस ॥

( ४३ ) राहे तेथें शिवसुत, तया पुष्पदेहेंचि[8] वाहीं ।
ओले झाले कुसुमचय[9] जे व्योमगंगाजलांहीं ॥
रक्षायातें शतमखदलें[10] ईश्वरें, आगळें[11] तें ।
सूर्याहूनी, वहनवदनीं, ओतिलें तेज होतें ॥

( ४४ ) ज्याचें तेजोवलयि गळलें, पिच्छ, कैलासराणी ।
पुत्रस्नेहें, कुवलयदलस्पर्धिसें, ठेवि कानीं ॥
सेनानीच्या, नगघनकृतें गर्जितें नाचवीच ।
मोरा, ज्याचीं खुलवि नयनें भर्गभालेन्दुतेज ॥

( ४५ ) सेवोनीया गुहें, पथिं पुढें सिद्धयुग्में पहासी ॥
जातां वीणेसह जलभयें सोडुनी त्वत्पथासी ॥
जी गोयज्ञप्रभव सरिता, सेविण्या तीस थांबें ।
रंतीशांचें यश अवतरे, जें जगीं स्रोतरूपें ॥

---

१. वेतस् म्ह० वेताचीं झाडें; वेतांचीं झाडें हेच हात, त्या हातांनीं. २. जंघा म्ह० मांडी: नदीचे तीर ह्याच जणुं तिच्या मांड्या;

**कल्पनासादृश्यः**–सैकतं च सरयूं विवृण्वतीं श्रोणिबिम्बमिव हंसमेखलम् ।
स्वप्रियाविलसितानुकारिणीं सौधजालविवरैर्व्यलोकयेत् ॥ (रघु. १९. ४०).

अन्वयः–तीचें, वेतसांच्या करांनीं हलु धरियले (लें), तीरजंघांवरोनी निसटले(लें) नीळें तोय (हेंच जणुं) अंबर (म्ह० वस्त्र), फेडीं. 'विवृतजघना' म्ह० जिच्या मांड्या विवस्त्र अथवा उघड्या पडल्या आहेत अशी. ३. धाली म्ह० संतोष पावलेली. ४. मधुर शब्द करून. ५. हत्ती; (वारा प्राशन करितात). ६. देवाद्रि म्ह० देवगिरीपर्वत. प्रोफेसर विल्सन यास माळव्याच्या मध्यभागीं असलेला पर्वत समजतो. त्यावर कार्तिकस्वामीचें देऊळ आहे. ७. प्रेरि म्ह० प्रोत्साहन देतो, पुढें जाण्यास मदत करतो. ८. पुष्परूपानें, अथवा पुष्पमय मेघाच्या रूपानें. मेघ हा इच्छारूपी असल्यामुळें, त्यास वाटेल तेव्हां, वाटेल तें, रूप घेतां येतें. ९. पुष्पोच्चय, अथवा पुष्पसंभार; या रूपानें मेघ कार्तिकेयावर पडत असतां, वाटेंत आकाशगंगेच्या पाण्यानें ते भिजून चिंब होतात. १०. "शतमख" म्ह० शंभर यज्ञ ज्यानें केले तो इन्द्र; "दलें" म्ह० सैन्यें. ११. 'आगळें' म्ह० अधिक; कार्तिकेय सूर्याहून अधिक तेजस्वी होता.

( ४१ ) तस्याः किंचित्करधृतमिव प्राप्तवानीरशाखं
नीत्वा नीलं सलिलवसनं मुक्तरोधोनितम्बम् ।
प्रस्थानं ते कथमपि सखे लम्बमानस्य भावि
ज्ञातास्वादो विवृतजघनां को विहातुं समर्थः ॥

( ४२ ) त्वन्निष्यन्दोच्छ्वसितवसुधागन्धसंपर्करम्यः
स्रोतोरन्ध्रध्वनितसुभगं दन्तिभिः पीयमानः ।
नीचैर्वास्यत्युपजिगमिषोर्देवपूर्वं गिरिं ते
शीतो वायुः परिणमयिता काननोदुम्बराणाम् ॥

( ४३ ) तत्र स्कन्दं नियतवसतिं पुष्पमेघीकृतात्मा
पुष्पासारैः स्नपयतु भवान्व्योमगङ्गाजलार्द्रैः ।
रक्षाहेतोर्नवशशिभृता वासवीनां चमूना-
मत्यादित्यं हुतवहमुखे संभृतं तद्धि तेजः ॥

( ४४ ) ज्योतिर्लेखावलयि गलितं यस्य बर्हं भवानी
पुत्रप्रेम्णा कुवलयदलप्रापि कर्णे करोति ।
धौतापाङ्गं हरशशिरुचा पावकेस्तं मयूरं
पश्चादद्रिग्रहणगुरुभिर्गर्जितैर्नर्तयेथाः ॥

( ४५ ) आराध्यैनं शरवणभवं देवमुल्लङ्घिताध्वा
सिद्धद्वन्द्वैर्जलकणभयाद्वीणिभिर्मुक्तमार्गः ।
व्यालम्बेथाः सुरभितनयालम्भजां मानयिष्य-
न्स्रोतोमूर्त्या भुवि परिणतां रन्तिदेवस्य कीर्तिम् ॥

१२. तें, म्ह० ते तेज अथवा वीर्य, म्हणजेच कार्तिकेय अथवा शिवसुत. १३. अग्निमुखीं; या प्रसंगाच्या विशेष खुलाश्यासाठीं, कुमारसंभव सर्ग १० श्लोक ६–१२ पहावे. १४. तेजोवलयांकित; तेजःपुंज वर्तुलें असलेलें मोराचें पिस. १५. गळलें म्ह० गळलेलें. १६. पार्वतीनें, कमलदलाबरोबरच, पुत्रस्नेहानें आपल्या कानावर मोराचें गळलेलें पिस ठेविलें, म्हणून जणुं काय त्याची स्पर्धा करणारें. १७. कार्तिकस्वामीच्या. १८. पर्वताच्या योगें (पर्वतांतील प्रतिध्वनिमुळें) दुमदुमून राहिलेल्या गर्जनेनें. १९. शंकराच्या भालीं असलेल्या चंद्राच्या तेजानें ज्या कार्तिकस्वामीच्या मोराचे डोळे खुलले आहेत, अशा मोराला, गर्जना करून नाचीव. २०. कार्तिकस्वामी, सेनानी. २१. पावसाच्या पाण्यानें वीणेच्या तारा भिजतील या भयानें मेघ-पथ सोडून सिद्धयुग्में दुसरीकडून जातात. २२. रंतिदेव किंवा रंतीश हा चंद्रवंशीय राजा होता. त्याची राजधानी दशपूर ही होती. तो दररोज यज्ञासाठीं दोन हजार गाई मारीत असे. अशा निरंतर गोवधामुळें ओल्या चामड्यांतून गळणाऱ्या रक्ताची चर्मण्वती ( चंबळा ) नांवाची नदी झाली, अशी आख्यायिका आहे. २३. नदीच्या रूपानें,

( ४६ ) तेव्हां घेण्या जल तिजकडे, श्यामला ! त्वां रिघावें ।
भासे पात्र पृथु[1]तर जिचें क्षीणसें दूर[2]भावें ॥
दृष्टी खालीं अमर करुनी दृश्य तैं पाहतील ।
कीं मोत्यांचा स[3]र अवनिचा, ज्या, मधें इन्द्र[4]नील ॥

( ४७ ) ओलांडोनी तिज, मग करी पात्र तूं रूप तूझें ।
जातां तेथें, दशपुर[5]वधूनेत्रकौतूहलांचें ॥
नाना[6]रंगीं तुज निर[7]खितां रंगलीं, भ्रूविलासीं ।
जीं[8] अभ्यासें चतुर; गमती कुंदगा भृंगराशी ॥

( ४८ ) ब्रह्मा[10]वर्तीं मग जनपदीं पाडुनीयां स्वछाया ।
जें क्षेत्रां[11]चें मरणं[12]चि, कुरुक्षेत्र तें जा पहाया ॥
जेथें रुंडें सितश[13]रशतें छेदुनी, सव्य[14]साची ।
धारा[15]सारें तव कमलिनी जेविं, वर्षी नृपांचीं ॥

( ४९ ) छायारूपें सखिनयनिंचें तेज घे जी रसाळी[16] ।
बन्धुस्नेहें, ससं[17]भ्रम सुरा[18] सोडुनी, रामं[19] धाला[20] ॥
सारस्[21]वत्यें पिउनि सलिलें; सेविं तीं, सौम्य[22] ! तूर्ण[23] ।
अंतःशुद्धी मग तुज घडे, तूं जरी कृष्णवर्ण ॥

---

१. फारच रुंद असलेलें पात्र. २. दूरच्या अंतरावर असल्यामुळें अगदीं बारीक दिसणारें. ३. वरून देव पहातील, त्यांना नदी जणुं पृथ्वीच्या गळ्यांतील मोत्यांचा सर, व मधें लटकत असलेला मेघ इन्द्रनीलमणि भासेल. ४. मेघ निळा असल्यामुळें इन्द्रनीलाची उपमा दिली आहे.

**कल्पनासादृश्यः**—मन्दाकिनी भाति नगोपकण्ठे मुक्तावली कण्ठगतेव भूमेः । ( रघु. १३.४८). ५. दशपूर, हें रंतिपूर किंवा मंडसोर गांव असावें: त्या गांवांतील स्त्रियांच्या नेत्रलीलांचें, ( तूं पात्र, म्हणजे विषय हो ).

६. डोळ्यांच्या रंगाचें वर्णन करण्यासाठीं मुळांत " कृष्णशार " हा शब्दप्रयोग वापरला आहे. " शार " म्ह० नानारंगांचे. सुंदर स्त्रियांच्या डोळ्यांचा रंग अमुकच हें सांगणें कठीण आहे. भावाविष्करणाच्या फेरफारानें डोळ्यांतील रंगांच्या छटाही फिरतात. ७. मुळांत " पक्ष्मोत्क्षेप " हा शब्दप्रयोग वापरला आहे. मेघ आकाशांत असल्यामुळें, वर पाहून त्याला निरखितानां, डोळ्यांच्या पापण्यांचा ( पक्ष्मांचा ) उत्क्षेप होणें साहजिकच आहे. ८. जीं म्ह० जीं नेत्रकौतुहलें. ९. कुंदफुलांकडे धांवणारे भ्रमरांचे थवे; डोळ्यांतील काळ्या व पांढऱ्या ( कुंदफुलें पांढरीं असतात ) रंगांचे मिश्रण, दीर्घत्व, व चांचल्य यांची, या

( ४६ ) त्वय्यादातुं जलमवनते शार्ङ्गिणो वर्णचौरे
तस्याः सिन्धोः पृथुमपि तनुं दूरभावात्प्रवाहम् ।
प्रेक्षिष्यन्ते गगनगतयो नूनमावर्ज्य दृष्टी-
रेकं मुक्तागुणमिव भुवः स्थूलमध्येन्द्रनीलम् ॥

( ४७ ) तामुत्तीर्य व्रज परिचितभ्रूलताविभ्रमाणां
पक्ष्मोत्क्षेपादुपविलसत्कृष्णशारप्रभाणाम् ।
कुन्दक्षेपानुगमधुकरश्रीमुषामात्मबिम्बं
पात्रीकुर्वन्दशपुरवधूनेत्रकौतूहलानाम् ॥

( ४८ ) ब्रह्मावर्तं जनपदमथ च्छायया गाहमानः
क्षेत्रं क्षत्रप्रधनपिशुनं कौरवं तद्भजेथाः ।
राजन्यानां सितशरशतैर्यत्र गाण्डीवधन्वा
धारापातैस्त्वमिव कमलान्यभ्यवर्षन्मुखानि ॥

( ४९ ) हित्वा हालामभिमतरसां रेवतीलोचनाङ्कां
बन्धुप्रीत्या समरविमुखो लाङ्गली याः सिषेवे ।
कृत्वा तासामभिगममपां सौम्य सारस्वतीना-
मन्तः शुद्धस्त्वमपि भविता वर्णमात्रेण कृष्णः ॥

---

अत्यंत मनोरम तुलनेनें प्रतिती येते. १०. हस्तिनापूरच्या वायव्येस सरस्वती व दृशद्वती या नद्यांमधील ( जनपदीं, म्हणजे ) प्रदेशावर. ११. क्षत्रियांचें. १२. मुळांतील " प्रधन " याचे दोन अर्थ होतात —( अ ) लढाई ( आ ) नाश या ठिकाणीं दुसराच अर्थ बरा दिसतो. १३. शेंकडोंशे तीक्ष्ण बाण मारून. १४. अर्जुन. १५. तूं तुझ्या मुसलधारा पाडून कमलांची डोकीं उडवितोस, तशीं राजांची डोकीं अर्जुनानें अर्धचंद्रकार तीर मारून ज्या कुरुक्षेत्रीं उडविलीं, तें कुरुक्षेत्र पहाण्यास जा. १६. रसाळा म्ह० अत्यंत स्वादिष्ट ( अशी सुरा म्ह० दारू ). दारू पीत असतांना, पेल्यांत शेजारीं बसलेल्या सुंदर पत्नीच्या ( सखीच्या ) डोळ्यांचें प्रतिबिंब पडत असे; अशी दारू व संग्राम दोन्हीं बळरामानें वैतागानें सोडली. १७. लढाई समवेत; लढाई व दारू बरोबरच सोडली. कौरवपांडवांविषयीं समान प्रेम असल्यामुळें, बळराम भारतीययुद्धाच्या वेळीं समरपराङ्मुख होऊन, तीर्थयात्रेस गेला, व सरस्वती नदीच्या कांठीं राहिला. १८. दारू. १९. बळराम. २०. आनंद पावला. २१ सरस्वती नदीचीं; ही नदी हिमालयाच्या दक्षिणेस उगम पावून कुरुक्षेत्राच्या उत्तर–पश्चिम वाहते, हिला गंगेइतकीच पवित्र समजतात. हें पाणी पिऊन, दारूचा अत्यंत भोक्ता असा बळरामही संतोष पावला. २२. सौम्य ! म्ह० हे सज्जना ! २३. विलंब न लावतां.

---

" पिशुनं " म्ह० आठवण देणारे.

( ५० ) जाई मागाहुनि कनखलीं, जान्हवी जेथ खालीं ।
येतां शैलांतुनि, सगरजां स्वर्गिची वाट झाली ॥
भ्रूभंगां जी हंसतचि सदा गौरिच्या, फेनरूपें ।
वेढी चंद्रा, धरि हरकचां ऊर्मिहस्तीं, प्रतापें ॥

( ५१ ) तीचें पाणी सुधवल तुला प्यावया बुद्धि झाली :
वांकोनीं जों, सुरगज जसा, पूर्वभागेंचि खाली ॥
छाया तूझी हलुहलु पुढें चालतां तत्प्रवाहीं ।
तीच्या अन्यस्थलिंच यमुनासंगमा लोक पाही ॥

( ५२ ) कस्तूरीचा विखरिति शिलाखंड जेथें सुवास ।
बर्फें शुभ्र प्रभवचि तिचें, पावतां तूं गिरीशें ॥
वाटे, जैं तच्छिखरिं बससी अध्वखेदा हराया ।
कीं नंदीनें चिखल खणिला तेथ केली कराया ॥

( ५३ ) पेटे घर्षें सरलतरुंच्या, चेतवी ज्यासि वारा ।
ज्याच्या ज्वाळा गिळिति चमरीपुच्छभारां भरारा ॥
दावाग्नीतें शमवि तिथल्या वर्षुनी वारिराशी ।
आर्तक्लेशप्रशमनपरा, संपदा सज्जनांची ॥

( ५४ ) रागें तेथें शरभ उडुनी, भंगण्यां कीं स्वकाय ।
लंघूं तूतें करिती जरि ते आडवाटे उपाय ॥
वर्षोनीयां विपुल करका, दूर ते हांकवावे ।
केल्या खोटी खटपट हटें, कोण सिद्धीस पावे ? ॥

---

१. हें हरिद्वाराजवळ गंगेच्या पश्चिम किनाऱ्यावर वसलेलें गांव आहे. तें फार पवित्र मानितात. २. हिमालयांतून. ३. कपिलमुनीच्या शापानें सगरराजाचे शंभरही उद्दाम पुत्र भस्मसात् झाले. त्यांना मुक्ती देण्यासाठीं त्यांचा वंशज भगीरथ यानें उग्र तपश्चर्या करून गंगा भूतलावर आणिली; म्हणून तिला भागीरथी म्हणतात.

**कल्पनासादृश्यः**—तुरगविचयव्यग्रानुर्वीभिदः सगराध्वरे ।
कपिलमहसामर्षात्प्लुष्टान् पुराप्रपितामहान् ॥ ( उत्तर. १. २३ ).

४. फेंसाचा रंग सफेत असून हास्याचाही तोच आहे. शंकराच्या मस्तकावर गंगेला पाहून गौरी सवतिमत्सरानें भुंवया चढविते, तिचे भ्रूभंग होतात; तें पाहून गंगेला हंसूं येते; हा तिचा फेंस, अशी कल्पना आहे. ५. लाटा हेच जणुं हात, त्यांनीं, शिवशिरस्थ गंगेनें, उन्मत्त लाडावलेल्या बायकोप्रमाणें शंकराचें केस धरिले; व चंद्रावरही हल्ला केला. ६. गंगेचें. ७. गंगेच्या शुभ्र प्रवाहावर मेघाची काळी छाया पडलेली पाहून गंगायमुनासंगमाचा भास, प्रयाग सोडून दुसरेच ठिकाणीं दिसेल. ८. विखरिति म्ह० पसरवितात. ९. शिलाखंड म्ह० दगड; त्यांवर हरिणें बसल्यामुळें त्यांस कस्तूरीचा वास येतो.

( ५० ) तस्माद्गच्छेरनुकनखलं शैलराजावतीर्णां
जह्नोः कन्यां सगरतनयस्वर्गसोपानपङ्क्तिम् ।
गौरीवक्त्रभ्रुकुटिरचनां या विहस्येव फेनैः
शंभोः केशग्रहणमकरोदिन्दुलग्नोर्मिहस्ता ॥

( ५१ ) तस्याः पातुं सुरगज इव व्योम्नि पश्चार्धलम्बी
त्वं चेदच्छस्फटिकविशदं तर्कयेस्तिर्यगम्भः ।
संसर्पन्त्या सपदि भवतः स्रोतसि च्छाययासौ
स्यादस्थानोपगतयमुनासङ्गमेवाभिरामा ॥

( ५२ ) *आसीनानां सुरभितशिलं नाभिगन्धैर्मृगाणां §
तस्या एव प्रभवमचलं प्राप्य गौरं तुषारैः ।
वक्ष्यस्यध्वश्रमविनयने तस्य शृङ्गे निषण्णः
शोभां $ शुभ्रत्रिनयनवृषोत्खातपङ्कोपमेयाम् ॥

( ५३ ) तं चेद्वायौ सरति सरलस्कन्धसंघट्टजन्मा
बाधेतोल्काक्षपितचमरीबालभारो दवाग्निः ।
अर्हस्येनं शमयितुमलं वारिधारासहस्रै-
रापन्नार्तिप्रशमनफलाः संपदो ह्युत्तमानाम् ॥

( ५४ ) ये संरम्भोत्पतनरभसाः स्वाङ्गभङ्गाय तस्मि-
न्मुक्ताध्वानं सपदि शरभा लङ्घयेयुर्भवन्तम् ।
तान्कुर्वीथास्तुमुलकरकावृष्टिपातावकीर्णा-
न्के वा न स्युः परिभवपदं निष्फलारम्भयत्नाः ॥

---

**कल्पनापादृश्यः**—" दृषदो वासितोत्सङ्गा निषण्णमृगनाभिभिः ( रघु. ४.७४ ) १०. बाप म्ह० हिमालय पर्वत. ११. गंगेचा. १२. पर्वतांचा राजा, अर्थात् हिमालय. १३. तत् शिखरिं, म्ह० त्याच्या शिखरीं. १४. रस्ता चालून आल्याचे श्रम. १५. 'केली' म्ह० उत्खातकेली; वर पू. मे. श्लो. २ पहा. १६. घर्षणानें. १७. एक जातीचा देवदार वृक्ष; त्याच्या फांद्या एक-मेकांवर घांसून वणवा लागतो. १८. वनगाई, ज्या हिमालयांत फार आहेत, त्यांच्या शेंपट्या झुपकेबाज असतात; ( ज्या शेपट्यांच्या चवऱ्या [ चामरें ] बनवितात ) अशा शेपट्यांचे संभार. १९. पाण्याचे लोट; ( वर्षून, लागलेला वणवा विझव. ) २०. 'आर्त' म्ह० संकटांत असलेले; 'प्रशमनपरा' म्ह० निवारण्यास तत्पर; संकटांत असलेल्यांचे क्लेश निवारण्यास तत्पर. २१. वाघ, सिंहाप्रमाणें भयंकर व बलाढ्य पशु; ही योनी आतां लुप्तप्राय आहे. दुसरा अर्थ, टोळ असा आहे. २२. मेघ शत्रु आहे, असें समजून शरभ त्यास मारण्यास, ढगांमागें लपलेल्या कड्याचें भान न राहतां, उडी मारितात, व कड्याखालीं पडून पाय मोडून घेतात. २३. आपली वाट सोडून २४. गारा.

---

* 'आसीनानां' म्ह० बसलेल्या; §"मृगाणां" म्ह० हरिणांच्या; $'शुभ्र' म्ह० पांढऱ्यासफेत.

(५५) मुद्रा तेथें भवपदकृता स्पष्ट पाषाणभागीं ।
भावें फेरा करिं तिज, जिला पूजिती नित्य योगी[2] ॥
घेती श्रद्धान्वित जरि तिच्या दर्शना, तत्प्रतापें[3] ।
जाती अंतीं चिरगणपदा[4], भस्म होवोनि पापें ॥

(५६) वेळू जातां भरुनि पवनें[5] वाजतो गोड पांवा ।
तैसा तेथें त्रिपुरजय[6] कीं, किन्नरीं आळवावा ॥
तूझा चंडध्वनि गिरिदरीं[7] ढोलसा जों घुमेल ।
संगीताचा मदनरिपुच्या संर्च तेथें जमेल ॥

(५७) तीं तीं स्थानें बघुनि, तटिं तो आक्रमोनी नगेन्द्र ।
गांठावें त्वां भृगुपतियशश्छिन्ह जें क्रौंचरंन्ध्र ॥
तेणें जाया त्वरित, कळता[10] डौल घे उत्तरेतें ।
श्रीविष्णूचा पदचि, बलिच्या[11] सिद्ध कीं संयमातें ॥

(५८) सांधे ज्याचे निजभुजबळें[12] रावणें सैल केले ।
जेणें कार्य त्रिदशवनिता[13]दर्पणाचें जहालें ॥
ज्याचीं शृंगें सुधवल, जणों हास्य[14] कीं त्र्यंबकाचें ।
गोळा[14] झालें प्रतिदिनिं; तया शैलिं तूं जावयाचें ॥

(५९) ऐंद्री[15] तो कीं नवकरिरद[16]च्छेदसा गौरवर्ण ।
मूर्तीं त्याच्या तटिं तव दिसे कज्जलाच्या समान ॥
शोभा, डोळे भरुनि बघण्या योग्य, तेव्हां दिसेल ।
वाटे कीं हा हलधर उभा लेवुनी कृष्णचेल ॥

---

१. शिवचरणन्यास; " हरकी पायरी " ही हरद्वाराजवळ आहे. हें अत्यंत पवित्र स्थान मानलेलें आहे. २. मुळांतील "सिद्ध" या शब्दाचा मल्लिनाथ " योगी " असा अर्थ करितो. 'गंधर्व', 'यक्ष', यांच्यासारखीच 'सिद्ध' म्हणूनहि एक देवयोनी आहे. ( कु. सं. १.५ पहा ) ३. ' तत् ' म्ह० तिच्या दर्शनाच्या; ' प्रतापें ' म्ह० प्रभावेंकरून. ४. ( शिवगणांच्या ) चिर म्ह० शास्वत पदाला, ( शिवचरणमुद्रादर्शनानें ), देहत्यागानंतर ( भक्तिवान लोक ) जातात. ५. **कल्पनासादृश्यः**—(अ) यः पूरयन्कीचकरंध्रभागान्दरीमुखोत्थेन समीरणेन ।
उद्गास्यतामिच्छति किंनराणां तानप्रदायित्वमिवोपगन्तुम् ॥ (कु.सं.१.८).
(आ) स कीचकैर्मारुतपूर्णरंध्रैः कूजद्भिरापादितवंशकृत्यम् ।
शुश्राव कुंजेषु यशः स्वमुच्चैरुद्गीयमानं वनदेवताभिः॥ (रघु.२.१२).

६. त्रिपुरजय म्ह० श्रीशंकरानें त्रिपुरासुरावर मिळविलेला जय. ७. गिरिदरीं म्ह० डोंगराच्या गुहांत. ८. वाऱ्यानें वाजवलेला पावा, किन्नरांचें जयघोषाचें गाणें, व मेघानें वाजवलेला ढोल यांचा समुच्चय. ९. कार्तिकेय व परशुराम शंकराजवळ धनुर्विद्या शिकत असतां परशुरामानें कार्तिकेयाशीं स्पर्धा करण्यासाठीं बाण मारून क्रौंच पर्वतास भोंक

( ५५ ) तत्र व्यक्तं दृषदि चरणन्यासमर्धेन्दुमौलेः
शश्वत्सिद्धैरुपचितबलिं भक्तिनम्रः परीयाः ।
यस्मिन्दृष्टे करणविगमादूर्ध्वमुद्धूतपापाः
संकल्पन्ते स्थिरगणपदप्राप्तये श्रद्दधानाः ॥

( ५६ ) शब्दायन्ते मधुरमनिलैः कीचकाः पूर्यमाणाः
¶ संसक्ताभिस्त्रिपुरविजयो गीयते किंनरीभिः ।
निर्ह्रादस्ते मुरज इव चेत्कन्दरेषु ध्वनिः स्या-
त्संगीतार्थो * ननु पशुपतेस्तत्र भावी समग्रः ॥

( ५७ ) प्रालेयाद्रेरुपतटमतिक्रम्य तांस्तान्विशेषा-
न्हंसद्वारं भृगुपतियशोवर्त्म यत्क्रौञ्चरन्ध्रम् ।
तेनोदीचीं दिशमनुसरेस्तिर्यगायामशोभि
श्यामः पादो बलिनियमनाभ्युद्यतस्येव विष्णोः ॥

( ५८ ) §गत्वा चोर्ध्वं दशमुखभुजोच्छ्वासितप्रस्थसंधेः
कैलासस्य त्रिदशवनितादर्पणस्यातिथिः स्याः ।
शृङ्गोच्छ्रायैः कुमुदविशदैर्यो वितत्य स्थितः खं $
राशीभूतः प्रतिदिनमिव त्र्यम्बकस्याट्टहासः ॥

( ५९ ) उत्पश्यामि त्वयि तटगते स्निग्धभिन्नाञ्जनाभे
सद्यःकृत्तद्विरददशनच्छेदगौरस्य तस्य ।
शोभामद्रेः स्तिमितनयनप्रेक्षणीयां भवित्री-
मंसन्यस्ते सति हलभृतो मेचके वाससीव ॥

---

पाडल्याची कथा आहे. मानससरोवराचा रस्ता क्रौंचरन्ध्रांतून आहे. १०. क्रौंचरन्ध्रांतून वाट अरुंद असल्यामुळें, मेघाला त्यांतून जातानां 'कलता' होण्यास सांगितलें आहे. ११. येथें श्रीविष्णूनीं वामनावतारीं बलीच्या मस्तकावर ठेवण्यासाठीं उचललेल्या पायाची कलता झालेल्या मेघाला, उपमा दिली आहे. १२. रावणानें कैलासपर्वत शंकरपार्वतीसह उचलून लंकेंत नेण्याचा प्रयत्न केल्याची कथा आहे. त्या प्रयत्नांत हिमालयाचे सांधे ढिले झाले, अशी कल्पना. १३. त्रिदश म्ह० देव. कैलासपर्वत अत्यंत स्वच्छ व शुभ्र आरशासारखा असल्यामुळें; देवस्त्रियांस आपलें रूप पाहण्यास 'दर्पण' म्ह० आरसा म्हणून कामीं येतो; दुसऱ्या आरशाची जरूर नाहीं. १४. हास्याचा रंग शुभ्र असल्यामुळें, कैलासपर्वतास श्रीशंकराच्या पुंजीभूत झालेल्या हास्याची उपमा दिली आहे. १५. पर्वत; हिमालय. १६. नव म्ह० नवीन; करि म्ह० हत्ती; रद म्ह० दंत; च्छेद म्ह० तुकडा; हस्तिदंताचा नवीनच कापून काढलेला तुकडा. १७. तट म्ह० पार्श्वदेश किंवा बाजू. १८. काजळ; ( मेघ काळा असतो ). १९. बळराम, जो रंगानें गौरवर्ण होता. २०. काळें वस्त्र; हिमाचलावर असलेला मेघ, जणुं बळरामानें कृष्णवस्त्र परिधान करावें, असा दिसतो.

---

¶ वाद्यविशेषांनीं युक्त असलेल्या. * खरोखर. § वर जाऊन. $ आकाशाला व्यापून राहिला आहे.

( ६० ) टाकोनीयां भुजगवलया, हात देतां[1] स्मरारी[2] ।
क्रीडा[3]शैलीं विचरत जरी पादचारें[4]चि गौरी ॥
गोठोनी[5] तूं स्वजल तिकडे पर्वपंक्ती[6] बनावें ।
कीं देवीनें तुजवरुनिया रत्नपीठीं[7] चढावें ॥

( ६१ ) वर्षे ज्याचें जल चहुंकडे, कंकणाग्रप्रघर्षें[8] ।
ऐशा तूतें बनविति सुरस्त्री जलावर्ष[9] हर्षें ॥
त्यांच्या हातांतुनि न सुटतां तूं निदाघीं[10] मिळाला ।
क्रीडालोला[11], भिवविं करुनी घोरशा गर्जिताला ॥

( ६२ ) हेमांभोज[12]प्रसवि जल तूं घेउनी मानसाचें[13] ।
होऊनीयां मुखपट[14] करीं कोड ऐरावताचें ॥
वातें कल्पद्रुम[15]किसलयें हालवीं अंशुकेंशी[16] ।
लीला ऐशा करुनि तिकडे हौस फेडीं मनाची ॥

( ६३ ) कैलासांकीं प्रणयिनि जशी, सोडुनी सैल चेलें ।
गंगारूपीं, बैसलि अलका, निश्चयें जाणशील ॥
कालीं तूझ्या धरित शिरिं जी, तुंगसौधें शाली ।
वर्षन्मेघां, जणुं युवति कीं मौक्तिकांचीच जाळी ॥

---

**कल्पनासादृश्यः**—(अ) व्यपगतमदरागस्यानुसस्मार लक्ष्मी-
मसितमधरवासो बिभ्रतः सीरपाणेः ॥ ( किरा. ४.३८ ).
(आ) वहसि वपुषि विशदे वसनं जलदाभम् ।
हलहतिभीतिमिलितयमुनाभम्
केशव धृतहलधररूप जय जगदीश हरे ( गी. गो. १.१.८ ).

१. सर्पांचें कडें. २. स्मर म्ह० मदन; मदनारी म्ह० शंकर. ३. क्रीडेसाठीं तयार केलेल्या कैलास पर्वतावर. ४. पायानें. ५. मेघ साधारणपणें विरल असतो; त्यांत घनत्व येण्यासाठीं त्यानीं आपलें पाणी गोठविलें पाहिजे. ६. पर्व म्ह० जिन्याची पायरी; पर्वपंक्ती म्ह० शिडी, जिना; तूं (पुढें होऊन) आपलें पाणी गोठवून, जिन्यासारखा हो; म्हणजे पार्वती त्या जिन्यावर चढून क्रीडाशैलावरील उंच अशा रत्नपीठावर जाऊं शकेल. ७. मणिमय पीठ म्ह० रत्नखचित सिंहासनासारखा तटप्रांत. ८. घर्षणानें; बांगड्यांचीं अग्रें तुझ्यावर घांसल्यामुळें, ज्या तुझें पाणी फंवाऱ्यासारखें चहुंकडे उडत आहे, (अशा तुला). ९. जलावर्ष म्ह० फंवारा अथवा धारागृह.

**कल्पनासादृश्यः**—शिलाविशेषानधिशय्य निन्युर्धारागृहेष्वातपमृद्धिमंतः॥(रघु.१६.४९).

१०. उकाड्याच्या दिवसांत हातीं आलेला. ११. खेळांत दंग झालेल्या; खेळाडु सुरस्त्रिया, उकाड्याच्या दिवसांत, हा बरा फंवारा मिळाला, असें म्हणून तुला धरून ठेवतील; त्यांच्या

( ६० ) हित्वा तस्मिन्भुजगवलयं शंभुना दत्तहस्ता
क्रीडाशैले यदि च विचरेत्पादचारेण गौरी ।
भङ्गीभक्त्या विरचितवपुः स्तम्भितान्तर्जलौघः
सोपानत्वं कुरु मणितटारोहणायाग्रयायी* ॥

( ६१ ) तत्रावश्यं वलयकुलिशोद्घट्टनोद्गीर्णतोयं
नेष्यन्ति त्वां सुरयुवतयो यन्त्रधारागृहत्वम् ।
ताभ्यो मोक्षस्तव यदि सखे घर्मलब्धस्य न स्या-
त्क्रीडालोलाः श्रवणपरुषैर्गर्जितैर्भाययेस्ताः ॥

( ६२ ) हेमाम्भोजप्रसवि सलिलं मानसस्याददानः
कुर्वन्कामं §क्षणमुखपटप्रीतिमैरावतस्य ।
धुन्वन्कल्पद्रुमकिसलयान्यंशुकानीव वातै-
$र्नानाचेष्टैर्जलद ललितैर्निर्विशेस्तं नगेन्द्रम् ॥

( ६३ ) तस्योत्सङ्गे प्रणयिन इव स्रस्तगङ्गादुकूलां
न त्वं दृष्ट्वा न पुनरलकां ज्ञास्यसे कामचारिन् ।
या वः काले वहति सलिलोद्गारमुच्चैर्विमाना
मुक्ताजालग्रथितमलकं कामिनीवाभ्रवृन्दम् ॥

इति महाकवि श्रीकालिदासविरचिते मेघदूते काव्ये
पूर्वमेघः समाप्तः

हातांतून सुटण्यासाठीं, गर्जना करून त्यांना भिवव, व पुढें जा. १२. सोन्याच्या कमळांनां जन्म देणारें. १३. मानससरोवराचें. १४. गंडस्थलावर घालण्याची झूल: तूं ऐरावताच्या मस्तकावर आरूढ हो. तो रंगानें शुभ्र आहे, व तूं निळा आहेस, म्हणून त्याच्या गंडस्थलावर झुलीसारखा, मुखपटासारखा, शोभशील: तसें करून त्याचें कोड पुरव. १५ कल्पवृक्षाची कोंवळीं पानें. १६. अंशुक म्ह० वस्त्र. 'अंशुकेंशी' म्ह० (रेशमी) वस्त्रांसारखीं (कोंवळीं पानें); 'वातें' म्ह० वाऱ्यानें, (हालव). १७. कैलासपर्वताच्या अंकीं म्ह० मांडीवर; कैलास हा प्रियकर, त्याच्या मांडीवर अलकानगरी, प्रणयिनीसारखी, वस्त्र सैल सोडून बसली आहे. १८. चेल म्ह० वस्त्र. १९. गंगारूपीं म्ह० गंगा हेंच जणुं, अलकानगरीनें आंगावर घेतलेलें वस्त्र. २०. बसलि म्ह० बसलेली. २१. निश्चयें म्ह० निःसंशय: (कारण तूं तिला अनेक वेळां पाहिली आहेस). २२. उंच व वैभवशाली वाडे जिच्या ठिकाणीं आहेत अशी जी; ती, तुझ्या काली, म्ह० वर्षाकालीं, जलवर्षाव करणाऱ्या मेघांनां आपल्या शिरीं, एखादी तरुण स्त्री माथ्यावर मोत्यांची जाळी घालते, तद्वत् धारण करते. २३. वर्षन्मेघ म्ह० जलबिंदुंचा वर्षाव करणारे मेघ.

* पुढें होऊन. § क्षणभर. $ नानातऱ्हेच्या चेष्टांनीं युक्त.

याप्रमाणें महाकवि श्रीकालिदास यानें रचिलेल्या
मेघदूत नांवाच्या काव्यांतील

# पूर्वमेघ समाप्त

# उत्तरमेघ.

( १ ) विद्युत्कल्पा[1] युवति, हरिचें चाप[2]सा चित्रसंघ ।
त्वद्गंभीर[3]ध्वनिपरि जिथें वाजताती मृदंग ॥
भूभागींचे मणि तव पयोतुल्य तेजाळ पाहीं ।
वाडे स्पर्धा करिति तव कीं, तुंग[4], ऐशा उपायीं ॥

( २ ) हातीं लीला[5]कमल, अलकीं[6] गुंफिलें कुंद ताजें ।
गालीं लोध्रप्रसव[7]रजजा, पांडुताही विराजे ॥
केशप्रान्तीं कुरबक[8] नवें, कर्णि[9] शोभे शिरीष ।
भांगीं[10] नीप[11], प्रसन्न तव, हा नारिंचा जेथ वेष[12] ॥

( ३ ) जेथें जाती स्फटिक[13]विमलीं यक्ष सौधाग्र[14]भागीं ।
तारा[15]बिंबीं रचित[16]सुम[17] जे, घेउनीयां शुभांगी[18] ॥
पीती मोदें रति[19]फलसुरा, कल्पवृक्षें दिली जे ।
वाजे जेव्हां मृदु मुरज, कीं ध्वनि[20] तूझेंचि गाजे ॥

( ४ ) श्री-गंगेच्या शिशिर[21]पवनीं शीण जाई जयांचा ।
मंदारांनीं, तदियं[22] तटिंच्या, ताप वारावयाचा ॥
क्रीडा[23]लोला, कनकसिकता[24]मुष्टिनीं झांकुनीयां[25] ।
रत्नें, जेथें हुडकिति सुर[26]प्रार्थिता यक्षकन्या ॥

---

१. विजेसारख्या लावण्यवती. २. इन्द्रधनुष्यासारखा, निरनिराळे रंग असलेल्या चित्रांचा समूह. ३. तुझ्या गंभीर गर्जनेसारखें;

**कल्पनासादृश्यः**—शिखरासक्तमेघानां व्यज्यन्ते यत्र वेश्मनाम् ।
अनुगर्जितसंदिग्धाः करणैर्मुरजस्वनाः ॥ ( कु. सं. ६. ४० ).

४. गगनचुंबी शिखरें असलेले. येथपासून अकराव्या श्लोकापर्यंत अलकानगरीचें वर्णन आहे; व प्रत्येक श्लोकांत " जेथें " हा शब्द येऊन, बाराव्या श्लोकांत " तेथें " हा शब्द येतो. हा श्लोक पूर्णोपमेचें उत्कृष्ट उदाहरण आहे. ५. खेळण्यासाठीं घेतलेलें कमल. ६. केसांत. ७. लोध्रफुलांच्या परागांपासून बनविलेली; हल्लीं बायका ' पावडर ' वापरतात, तशा पूर्वीं यक्षिणीही वापरीत असत. ८. कोरांटीचें फुल. ९. शिरसाचें फुल. १०. भांगांत. ११. कदंबाचें फुल. १२. वेषभूषा; अलंकार. १३. स्फटिकाच्या बनविलेल्या असल्यामुळें अत्यंत शुभ्र. १४. वाड्याच्या शेवटल्या मजल्यावरील गच्च्यांवर. १५. त्या



पीती मोदें रतिफळतुरा कल्पवृक्षीं दिली जे।

श्लोक ३ पहा.

# उत्तरमेघ.

( १ ) विद्युत्वन्तं ललितवनिताः सेन्द्रचापं सचित्राः
संगीताय प्रहतमुरजाः स्निग्धगम्भीरघोषम् ।
अन्तस्तोयं मणिमयभुवस्तुङ्गमभ्रंलिहाग्राः *
प्रासादास्त्वां तुलयितुमलं यत्र तैस्तैर्विशेषैः ॥

( २ ) हस्ते लीलाकमलमलके बालकुन्दानुविद्धं
नीता लोध्रप्रसवरजसा पाण्डुतामानने श्रीः ।
चूडापाशे नवकुरबकं चारु कर्णे शिरीषं
सीमन्ते च त्वदुपगमजं यत्र नीपं वधूनाम् ॥

( ३ ) यस्यां यक्षाः सितमणिमयान्येत्य हर्म्यस्थलानि
ज्योतिश्छायाकुसुमरचितान्युत्तमस्त्रीसहायाः ।
आसेवन्ते मधु रतिफलं कल्पवृक्षप्रसूतं
त्वद्गम्भीरध्वनिषु शनकैः पुष्करेष्वाहतेषु ॥

( ४ ) मन्दाकिन्याः सलिलशिशिरैः सेव्यमाना मरुद्भि-
र्मन्दाराणामनुतटरुहां छायया वारितोष्णाः ।
अन्वेष्टव्यैः कनकसिकतामुष्टिनिक्षेपगूढैः
संक्रीडन्ते मणिभिरमरप्रार्थिता यत्र कन्याः ॥

---

सफेत स्फटिकांच्या गच्च्यांत आकाशांतील ताऱ्यांचीं प्रतिबिंबें पडल्यामुळें, जमिनीवर फुलांचा सडा रचला आहे, असा भास उत्पन्न करणारे.

**कल्पनासादृश्यः**—यत्र स्फटिकहर्म्येषु नक्तमापानभूमिषु ।
ज्योतिषां प्रतिबिंबानि प्राप्नुवन्त्युपहारताम् ॥ ( कु. सं. ६. ४२ ).

१६. जे म्ह० जे भाग. १७. रूपवती स्त्रिया. १८. रति-उत्पादक, कामोद्दीपक अशी सुरा म्ह० दारू. १९. मृदु म्ह० हलक्या आवाजांत: 'मृदु' हें 'वाजे' या क्रियापदाचें क्रियाविशेषण आहे. 'मुरज' म्ह० मृदंग. २०. ध्वान म्ह० गर्जना.

२१. थंडवाऱ्यानें. २२. तिच्या म्ह० गंगेच्या किनाऱ्यावरील. २३. क्रीडासक्त; खेळण्यांत दंग झालेल्या. २४. सोन्याच्या वाळूच्या मुठी वर टाकून; 'सिकता' म्ह० वाळु, रेती; हा एक गुप्त-मणि नांवाचा खेळ त्यावेळीं प्रचारांत होता. २५. देव देखील ज्यांची, आसक्त होऊन, इच्छा करितात, इतक्या सुंदर.

---

* आकाशास भिडणारे ( वाडे ).

( ५ ) झालीं वस्त्रें शिथिल, निरिची गांठ जातां सुटोनी ।
प्रेमोल्लासें, चपल करिं तीं[2] फेडितां, तत्प्रियांनीं ॥
रत्नें ठेलीं उजळ जवळीं, मानुनी दीप, वांया ।
लज्जामूढा[3], उधळिति बुका[4], जेथ तीं मालवाया[5] ॥

( ६ ) जेथें, वारा भवनशिखरीं, त्वत्समां तोयदांतें[6] ।
नेई; त्यांनीं[7] नवजलकणीं[8] दूषितां चित्र-जातें[9] ॥
भेणें[10] भासे चतुर पळती, जालमार्गें[11], अहो! ते ।
अंगें ज्यांचीं शिथिल, वरुनी शीघ्र धूमाकृतीतें[12] ॥

( ७ ) सूत्रालंबी पृथुजलकणां वर्षुनी चंद्रकान्त ।
शीतांशूच्या विशद किरणीं, लोपतां त्वन्निरोधें ॥
ग्लानी जेथें, सुरतजनिता, नेति नाशा स्त्रियांची ।
रात्रौ, होतां प्रियजनकरांतूनि मुक्ती तयांची ॥

( ८ ) गेहीं ज्यांच्या क्षय नच धना, यक्ष ऐसे विलासी ।
संगें, गाया धनपतियशा घेउनी किन्नरांसी ॥
प्रेमालापें विहरति सदा अप्सरांच्या समेत ।
विभ्राजाख्योपवनिं, नगरापासुनी दूर, जेथ ॥

---

१. कल्पनासादृश्यः—प्रच्छन्नौ व्रजतस्तनौ प्रकटतां श्रोणीतटं दृश्यते ।
नीवी च स्खलति स्थितापि सुदृढं कामेंगितं योषितां ॥
रतिर. ( सामान्यधर्माधिकार २६ )

२. तीं म्ह० वस्त्रें. ३. लज्जेमुळें गोंधळून गेलेल्या; प्रियकरांनीं, सैल झालेलीं वस्त्रें चपल करांनीं एकदम ओढून सोडलीं, म्हणून लज्जा उत्पन्न झाली; व त्यामुळें गोंधळून जवळ असलेलीं रत्नें हीं दिवे आहेत असा भ्रम झाला. ४. रत्नें दिवे आहेत असें समजून, ते विझवण्याकरितां त्या बुका उधळतात. ५. विझविण्यास; अत्यंत तेजस्वी रत्नें दिव्यांच्या जागीं वापरतात, हें विसरून, लज्जा-संभ्रांत युवती त्यां रत्नांवर बुका फेंकून त्यांचा प्रकाश नाहींसा करण्याचा यत्न करितात; हें भ्रान्तिमत आणि उदात्त या दोन्ही अलंकारांचें उत्कृष्ट उदाहरण आहे. ६. 'तोयद' म्ह० तोय किंवा पाणी देणारे, अर्थात् मेघ. या श्लोकांत मेघांची, परस्त्रीलंपट वाममार्गी पुरुषांशीं, वाऱ्याची त्यांच्या वाटाड्याशीं, व चित्र-समूहांची कुलस्त्रियांशीं तुलना केली आहे. ७. त्यांनीं म्ह० त्या तोयदांनीं. ८. नवीन पाण्याच्या तुषारांनीं. ९. चित्र-समूह दूषित केल्यावर; उंच मजल्यावरील दालनांत मेघांची अभ्रें गेल्यामुळें, त्या दालनांतील चित्रसमूहांवर नवीन पाण्याचे तुषार बसतात, व तीं चित्रें दूषित होतात. 'जात' म्ह० समूह; १०. भेणें म्ह० भिऊन. ११. खिडकीवाटे. १२. धुराच्या रूपानें. टीपः वाम-मार्गी पुरुष ( मेघ ) मध्यस्थाच्या (वाऱ्याच्या)सहाय्यानें गृहस्थांच्या घरांत चोरून शिरून, त्यांच्या चित्रासारख्या सुरेख असलेल्या कुलकन्यका (चित्रजातें) दूषित केल्यावर, भयभीत व शिथिलगात्र होत्साते, वेषांतर करून,



प्रेमालापं विहरति सदा अप्सरांच्या समेत।
विभ्राजाख्योपवनिं, नगरापासुनी दूर, जेथ॥

पृ. ३४

श्लोक ८ पहा.

( ५ ) नीवीबन्धोच्छ्वसितशिथिलं यत्र * बिम्बाधराणां
क्षौमं रागादनिभृतकरेष्वाक्षिपत्सु प्रियेषु ।
अर्चिस्तुङ्गानभिमुखमपि प्राप्य रत्नप्रदीपा-
न्ह्रीमूढानां भवति विफलप्रेरणा चूर्णमुष्टिः ॥

( ६ ) नेत्रा नीताः सततगतिना यद्विमानाग्रभूमी-
रालेख्यानां नवजलकणैर्दोषमुत्पाद्य सद्यः ।
शङ्कास्पृष्टा इव जलमुचस्त्वादृशा जालमार्गै-
र्धूमोद्गारानुकृतिनिपुणा जर्जरा निष्पतन्ति ॥

( ७ ) यत्र स्त्रीणां प्रियतमभुजालिङ्गनोच्छ्वासिताना-
मङ्गग्लानिं सुरतजनितां तन्तुजालावलम्बाः ।
त्वत्संरोधापगमविशदैश्चन्द्रपादैर्निशीथे
व्यालुम्पन्ति स्फुटजललवस्यन्दिनश्चन्द्रकान्ताः ॥

( ८ ) अक्षय्यान्तर्भवननिधयः प्रत्यहं § रक्तकण्ठै-
रुद्गायद्भिर्धनपतियशः किंनरैर्यत्र सार्धम् ।
वैभ्राजाख्यं विबुधवनितावारमुख्यासहाया
बद्धालापा बहिरुपवनं कामिनो निर्विशन्ति ॥

---

खिडकीवाटे म्ह० आडवाटेनें निघून जातात, असा अर्थ ध्वनित आहे; व सरळ अर्थाप्रमाणें, मेघाचीं अभ्रें वाड्यांच्या उंच दालनांत गेल्यामुळें तेथील चित्र-समूहांवर नवीन पाण्याचे तुषार बसत असल्याचें नैसर्गिक वर्णन आहे. १३. दोऱ्यांनीं, पलंगाच्या छताला ( वितानाला ) टांगून ठेविलेले ( चन्द्रकान्त ). चिपळुणकरांनीं या शब्दप्रयोगाचें भाषान्तर " गळां घालिती चंद्रकान्त मणिहार" असें केलें आहे; व त्यांच्या नंतरच्या दोन्ही भाषान्तरकारांनीं, पहिलें भाषान्तर किल्ल्यासारखें समोर ठेवून तीच चूक केली आहे. मल्लिनाथ " वितानलम्बिसूत्र-पुञ्जाधाराः " असा अर्थ करतो, व तोच आमच्या मतें योग्य आहे. गळ्यांतील चंद्रकान्त मण्यांवर चंद्रप्रकाश मोकळेपणें पडल्यामुळें, ते " स्फुटजलस्यंदि " होणें शक्य नाहीं. ' पृथुजलकण ' म्ह० मोठमोठाले पाण्याचे थेंब.

१४. कल्पनासादृश्यः—( अ ) चन्द्रपातजनितप्रवृत्तिभिश्चन्द्रकान्तजलबिन्दुभिर्गिरिः ।
मेखलातरुषु निद्रितानिमान्बोधयत्यसमये शिखण्डिनः ॥ ( कु. सं. ८.६७ ).

( आ ) कान्तेन्दुकान्तोपलकुट्टिमेषु प्रतिक्षपं हर्म्यतलेषु यत्र ।
उच्चैरधःपातिपयोमुचोऽपि समूहमूहुः पयसां प्रणाल्यः ॥ (शिशु. ३.४४).

१५. चंद्राच्या. १६. पांढऱ्या शुभ्र. १७. तुझा आडपडदा दूर होतां. १८. रतिविलासामुळें उत्पन्न झालेली ( ग्लानि ). १९. समवेत. २०. ' विभ्राज ' नांवाच्या उपवनांत.

---

* बिम्बाधराणां म्ह० तोंडल्याप्रमाणें लाल अधरोष्ठ असलेल्या. § गोड आवाजाच्या.

( ९ ) जातां वेगें अलकिं रचिलीं पर्णपुष्पें गळाली ।
मंदाराचीं; कनककमलें कर्णिचीं वेगळालीं ॥
जाळ्या, तैसे सर, कुर्चतटीं भंगले मोतियांचे ।
जेथें, सूर्योदयिं, सुचविती नैशमार्ग स्त्रियांचे ॥

( १० ) राहे, जेथें, धनपतिसखा शंभु तो, या भयेंची ।
ज्यांची दोरी भ्रमर, न तया, काम चापासि योजी ॥
भ्रूनेत्रांनीं चतुर युवती योजिती जे विलास ।
त्यांहीं होतां विकल विरही, सिद्धि ये मन्मथास ॥

( ११ ) रंगी वस्त्रें, मधु शिकविण्या दक्ष नाना विलास ।
ताज्या पानांसह बहु कळ्या, भूषणांचे विकास ॥
लावाया जो सुबक अळिता रम्य पादांबुजाला ।
जेथें इच्छातरुच सगळीं मंडनें दे स्त्रियांला ॥

( १२ ) तेथें माझें गृह, नृपगृहापासुनी उत्तरेनें ।
देखावें, जें, सुरधनुसमा, दूरुनी, तोरणानें ॥
आहे ज्याचे जवळि सखिनें वर्धिलां जेंवि तोकें ।
हातीं येई सुमभर असा, बालमंदार एक ॥

( १३ ) वापी जीचे पथ घडविले पाचुच्या पायऱ्यांचे ।
हैमां जेथें विकचकमलां नाल वैडूर्य साचे ॥
आनंदानें उदकिं वसतां जेथ हंसांसि नाहीं ।
तूंही येतां जवळि, रति ती मानसीं, बा ! कदाही ॥

---

१. केसांत. २. रचिलेलीं. ३. गळून पडलेलीं. ४. वेगळीं होऊन पडलेलीं. ५. त्या कालीं मोत्यांच्या जाळ्यांच्या चोळ्या करीत असत असें दिसतें. ६. स्तनप्रदेशावर; ( भंगलेले, तुटलेले, मोत्यांचे सर ). ७. रात्रौ ज्या वाटांनीं गेल्या ते मार्ग;

**कल्पनासादृश्यः**–निशासु भास्वत्कलनूपुराणां यः संचरोऽभूदभिसारिकाणाम् । (रघु. १६.१२). ८. कुबेराचा मित्र शंकर. ९. शंकरानें मदनास जाळल्यामुळें तो त्यास भितो. १०. 'तो' म्ह० ज्यानें मदनास जाळिला तो. ११. 'ज्याची' म्ह० ज्या चापाची ( दोरी भ्रमरपंक्ति हीच आहे, असें ).

**कल्पनासादृश्यः**—अलिपङ्क्तिरनेकशस्त्वया गुणकृत्ये धनुषो नियोजिता ।(कु. सं. ४.१५). १२. भ्रू आणि नेत्र. १३. 'त्यांहीं' म्ह० त्या भ्रू-नेत्र-विलासांनीं. १४. शंकराच्या भयानें मदन आपलें चाप सज्ज करित नाहीं; परन्तु चतुर युवतींनीं, भृकुटिक्षेप व नेत्रकटाक्षांची योजना विरही लोकांवर केल्यावर, मदनास, भ्रमरचाप न योजतांही यश येतें. १५. दारू, जी प्याल्यानंतर नाना रतिविलास सुचतात, असा भावार्थ आहे.

( ९ ) गत्युत्कम्पादलकपतितैर्यत्र मन्दारपुष्पैः
पत्रच्छेदैः कनककमलैः कर्णविभ्रंशिभिश्च ।
मुक्ताजालैः स्तनपरिसरच्छिन्नसूत्रैश्च हारै-
र्नैशो मार्गः सवितुरुदये सूच्यते कामिनीनाम् ॥

( १० ) मत्वा देवं धनपतिसखं यत्र § साक्षाद्वसन्तं
प्रायश्चापं न वहति भयान्मन्मथः षट्पदज्यम् ।
सभ्रूभङ्गप्रहितनयनैः कामिलक्ष्येष्वमोघै-
स्तस्यारम्भश्चतुरवनिताविभ्रमैरेव सिद्धः ॥

( ११ ) वासश्चित्रं मधु नयनयोर्विभ्रमादेशदक्षं
पुष्पोद्भेदं सह किसलयैर्भूषणानां विकल्पान् ।
लाक्षारागं चरणकमलन्यासयोग्यं च यस्या-
मेकः सूते सकलमबलामण्डनं कल्पवृक्षः ॥

( १२ ) तत्रागारं धनपतिगृहानुत्तरेणास्मदीयं
दूराल्लक्ष्यं सुरपतिधनुश्चारुणा तोरणेन ।
यस्योपान्ते कृतकतनयः कान्तया वर्धितो मे
हस्तप्राप्यस्तबकनमितो बालमन्दारवृक्षः ॥

( १३ ) वापी चास्मिन्मरकतशिलाबद्धसोपानमार्गा
हैमैश्छन्ना विकचकमलैः ¶ स्निग्धवैदूर्यनालैः ।
यस्यास्तोये कृतवसतयो मानसं † सन्निकृष्टं
नाध्यास्यन्ति व्यपगतशुचस्त्वामपि प्रेक्ष्य हंसाः ॥

---

१६. **कल्पनासादृश्यः**—नयनान्यरुणानि घूर्णयन्वचनानि स्खलयन्पदे पदे ।
असति त्वयि वारुणीमदः प्रमदानामधुना विडम्बना ॥ ( कु. सं. ४.१२ ).

१७. नाना प्रकार. १८. एकटा कल्पतरु. पहिल्या अकरा श्लोकांत, " जेथें " असें वर्णन संपल्यावर, या बाराव्या श्लोकांत " तेथें " असें येतें. १९. ' वर्धिला ' म्ह० वाढविला. २०. मुलासारखा.

**कल्पनासादृश्यः**—( अ ) अमुं पुरः पश्यसि देवदारुं पुत्रीकृतोऽसौ वृषभध्वजेन ।
यो हेमकुम्भस्तननिःसृतानां स्कन्दस्य मातुः पयसां रसज्ञः ॥ ( रघु. २.३६ ).
( आ ) अतन्द्रिता सा स्वयमेव वृक्षकान्घटस्तनप्रस्रवणैर्व्यवर्धयत् । ( कु. सं. ५.१४ ).

२१. विहीर. २२. उत्फुल्ल सोन्याच्या कमळांना. २३. नाल म्ह० देंठ. २४. एक जातीचें रत्न. इंग्रजींत, ' लॅपिस लाझुली '. २५. वर्षाकाल जवळ येतांच हंस मानससरोवराकडे उडून जातात; पण ही विहीर इतकी सुंदर आहे, कीं तींतील हंस वर्षाकालींही उडून जात नाहींत. २६. रति म्ह० आवड. २७. मानससरोवराविषयीं.

§ प्रत्यक्ष. ¶ चकचकित. † जवळच असलेलें.

( १४ ) तीच्या तीरावरि बनविला विश्रमा एक शैल ।
भौंतीं ज्याच्या कनककदली, शेखरीं इन्द्रनील ॥
आजूबाजू बिजली चमके, पाहुनी ऐसियातें ।
तूतें, कान्ताप्रिय बहुत जो, आठवीं मी तयातें ॥

( १५ ) रक्ताशोका चलदल, तसें कान्तशा केसराला ।
कोरांटीची वइ वेळि जिथें माधवीमंडपाला ॥
पाहें तेथें; करित सखिचा एक पादाभिलाष ।
आयासी तद्वदनमदिरापानवांछा दुज्यास ॥

( १६ ) आहे तेथें स्फटिकफलकीं रोंविला हेमदंड ।
ज्याच्या मूलीं दिसत हिरवेचारसे रत्नखंड ॥
नाचे तालें वलयरणितें जो प्रियेच्या समोर ।
जेथें बैसे दिवस सरतां तो तुझा मित्र मोर ॥

( १७ ) ऐशा, साधो! सदन अमुचें ओळखावें खुणांनीं ।
तैसे द्वाराजवळि लिहिलीं शंखपद्में बघूनी ॥
तेथें जातां तुज अवकळा निश्चयें, बा! दिसेल ।
अस्तीं जातां रवि, कमल तें कां न दैन्या वरील? ॥

---

१. विश्रमासाठीं, आरामासाठीं. २. पर्वत; क्रीडापर्वत. पूर्वमेघ श्लोक ६० पहा. ३. सभोंवतीं. ४. शिखरावर. ५. तुझ्या आजूबाजूला वीज चमकते तशा त्या क्रीडाशैलाच्या सभोंवतीं सुवर्णकर्दली आहेत; म्हणून, तुला पाहून त्या पर्वताची आठवण येते. ६. अशा तुला पाहून. ७. (माझ्या) कान्तेला (बहुत) प्रिय आहे (असा पर्वत). ८. पर्वतातें. ९. लाल फुलांचा, 'रक्ताशोक' नांवाचा, अशोकवृक्ष; ज्याचीं पानें हालत आहेत (चलदल) असा. १०. सुंदर अशा. ११. 'वळि' क्रियापदार्थी वापरलें आहे; वेष्टन घालते; वल्‌:वेष्टन घालणें (आपट्यांचा कोश पहा). १२. इतर ठिकाणीं फक्त वसंतऋतूंत फुलणारी 'वासंती' नांवाची एक लता. हिला पांढरीं सुवासिक फुलें येतात. १३. एक म्ह० रक्ताशोक. १४. आयास देते; पीडा देते. कित्येक झाडांस माणसांप्रमाणें डोहाळे (तीव्र इच्छा) होतात, आणि त्या इच्छांचा संबंध माणसांच्या कृतींशीं असतो, ही कल्पना संस्कृत काव्यांत वारंवार आढळते. "स्त्रीणां स्पर्शात्प्रियंगुर्विकसति बकुलः सीधु गंडूषसेकात्।" या श्लोकांत अनेक झाडांचीं नांवें, व त्यांना होत असलेल्या डोहाळ्यांची यादी दिली आहे. मनुष्यांत व वनस्पतींत सहानुभूतीचा नाजुक धागा असल्याची कल्पना रम्य आहे. या श्लोकांत सहोक्ति अलंकार आहे.

**कल्पनासादृश्यः**-( अ ) अकुसुमितमशोकं दोहदापेक्षया वा
प्रणमितशिरसं वा कान्तमार्द्रापराधम् ॥ ( मालवि. ३. १२ ).

(१४) तस्यास्तीरे रचितशिखरः पेशलैरिन्द्रनीलैः
क्रीडाशैलः कनककदलीवेष्टनप्रेक्षणीयः * ।
मद्गेहिन्याः प्रिय इति सखे चेतसा कातरेण
प्रेक्ष्योपान्तस्फुरिततडितं त्वां तमेव स्मरामि ॥

(१५) रक्ताशोकश्चलकिसलयः केसरश्चात्र कान्तः
प्रत्यासन्नौ कुरवकवृतेर्माधवीमण्डपस्य ।
एकः सख्यास्तव † सह मया ¶ वामपादाभिलाषी
काङ्क्षत्यन्यो वदनमदिरां दोहदच्छद्मनास्याः ॥

(१६) तन्मध्ये च स्फटिकफलका काञ्चनी वासयष्टि-
र्मूले बद्धा मणिभिरनतिप्रौढवंशप्रकाशैः । ‡
तालैः शिञ्जावलयसुभगैर्नर्तितः कान्तया मे
यामध्यास्ते दिवसविगमे नीलकण्ठः सुहृद्वः ॥

(१७) एभिः साधो $ हृदयनिहितैर्लक्षणैर्लक्षयेथा
द्वारोपान्ते लिखितवपुषौ शङ्खपद्मौ च दृष्ट्वा ।
क्षामच्छायं भवनमधुना मद्वियोगेन + नूनं
सूर्यापाये न खलु कमलं पुष्यति स्वामभिख्याम् ॥

---

(आ) असूत सद्यः कुसुमान्यशोकः स्कन्धात्प्रभृत्येव सपल्लवानी ।
पादेन नापेक्षत सुन्दरीणां संपर्कमासिञ्जितनूपुरेण ॥ (कु. सं. ३. २६).

(इ) स्मरतेव सशब्दनूपुरं चरणानुग्रहमन्यदुर्लभम् ।
अमुना कुसुमाश्रुवर्षिणा त्वमशोकेन सुगात्रि शोच्यसे ॥ (रघु. ८. ६३).

१५. तिनें तोंडांतून टाकलेली दारूची चूळ पिण्याची इच्छा. १६. दुज्यास म्ह० केसरास.
१७. स्फटिकाच्या फळ्यावर. १८. मोर बसविण्यासाठीं बनविलेली सोन्याची काठी.

१९. कल्पनासादृश्यः—भ्रमिषु कृतपुटांतर्मण्डलावृत्ति चक्षुः प्रचलितचटुलभ्रूताण्डवैर्मण्डयन्त्या ।
करकिसलयतालैर्मुग्धया नर्त्यमानं सुतमिव मनसा त्वां वत्सलेन स्मरामि॥(उत्तर. ३.१९).

२०. कंकणांच्या नादानें युक्त अशा तालावर मोर नाचत असतां. यक्षस्त्री हातानें ताल धरते, तेव्हां त्या तालांत तिच्या हातांतील बांगड्यांचा आवाज मिसळतो. २१. लिहिलेलीं.
२२. दरवाज्यासमोर रांगोळीनें शंखपद्माकृती काढण्याची चाल अजूनही, विशेषतः पार्शी लोकांत, रूढ आहे. २३. यक्षाच्या जाण्याची रवीच्या अस्ताशीं केलेली तुलना अत्यंत रम्य आहे. रवि अस्ताला गेला, तरी रात्र संपल्यावर दुसऱ्या दिवशीं, पुन्हा उगवतो, तद्वत् शाप संपतांच यक्ष पुन्हां येईल, असा भावार्थ आहे.

---

* पाहण्या लायक. † माझ्यासमवेत. ¶ डाव्या. ‡ कोंवळ्या वेळूप्रमाणें. $ हृदयांत बाळगिलेल्या. + मी नसल्यामुळें.

( १८ ) खालीं येण्या गजकलभ[1]सें शीघ्र देहं बनावें ।
क्रीडाशैलीं, प्रथम कथिं[2]ल्या, येउनीयां बसावें ॥
विद्युद्[3]दृष्टी स्थिरवुनि तिथें, फेंक तैसी समोर ।
ख[4]द्योतांची लुकलुक जशी, मद्गृहीं, तूं, सुदूर ॥

( १९ ) एणा[5]क्षी जी यु[6]वति, सु[7]दंती, पक्का[8]बिंबाधरा जे ।
नाभी जीची सखल[9], क[10]टितें पाहुनी सिंह लाजे ॥
श्रोणी[11]भारें अलसगमना, नम्र पीनस्त[12]नांही ।
त[13]न्वी, योषासृ[14]जनिं विधिंची आद्यसृष्टी जे[15]पूं ही ॥

( २० ) जाणीं माझें हृदय[16]चि दुजें, ती प्रिया अल्पभाषी ।
होतां दूर प्रियजन तिचा, एकली जी उदासी ॥
गाढोत्कण्ठा, दिन बहुलें[17] हे, जी प्रयासेंचि गाळी ।
वाटे झाली शिशिरें[18]मथिता [19]पद्मिनीशी निरांळी ॥

( २१ ) नेत्रीं तीच्या रडुनि रडुनी आं[20]कसें सूज आली ।
उष्णोश्वासें अधरपुटिंची रक्ति[21]मा नष्ट झाली ॥
हातीं ठेलें मुख अधि[22]कसें झांकलें लांब केशीं ।
इंदू जैसा त्वद[23]नुसरणें हीन[24]कांती दिसेची ॥

---

१. हत्तीच्या पिल्लासारखें. .२. कथिलेल्या; मागें १४ व्या श्लोकांत वर्णिलेल्या. ३. वीज हीच नजर. वीज हे मेघाचे डोळे कल्पिले आहेत. ४. काजव्यांची (लुक्लुक् ). ५. एण म्ह० हरिण; हरिणासारख्या डोळ्यांची. ६. मुळांत " श्यामा " शब्द आहे. ' श्यामा ' म्ह० नवयौवना.

कूपोदकं वटच्छाया श्यामा स्त्री चेष्टकाल्यम् ।
शीतकाले भवेदुष्णं ग्रीष्मकाले च शीतलम् ॥ (सु. र. भां. पृ. १६९ श्लो. ४२१).

७. दन्ताः शिखरिणी यस्या दीर्घे जोवति तत्प्रियः । सामुद्रिके ( मल्लिनाथः )
८. पिकलेल्या तोंडल्याप्रमाणें लाल अधरोष्ठ असलेली.
९. नाभीगांभीर्य हें मदनातिरेकाचें लक्षण समजलें जातें. ' सखल ' म्ह० खोल. १०. हें " मध्ये क्षामा " या मुळांतील शब्दप्रयोगाचें भाषान्तर आहे. ११. ' श्रोणी ' म्ह० नितंब, ढुंगण; पुष्ट नितंब असल्यामुळें हलु चालणारी.
**कल्पनासादृश्यः**—न दुर्वहश्रोणिपयोधरार्ता भिन्दन्ति मंदां गतिमश्वमुख्यः ॥ (कु. सं. १.११).
१२. पीन म्ह० पुष्ट; जिचे स्तन पुष्ट असल्यामुळें त्यांच्या भारानें जी किंचित् नम्र, म्ह० वांकलेली आहे. १३. नाजुक शरीराची. १४. स्त्री उत्पन्न करण्याच्या विधीच्या प्रयत्नाचें पहिलें सर्वोत्कृष्ट फल. **कल्पनासादृश्यः**-"स्त्रीरत्नसृष्टिरपरा प्रतिभाति सा मे"(शा. २.९). १५. या श्लोकापासून

( १८ ) गत्वा सद्यः कलभतनुतां शीघ्रसंपातहेतोः
क्रीडाशैले प्रथमकथिते रम्यसानौ * निषण्णः ।
अर्हस्यन्तर्भवनपतितां कर्तुमल्पाल्पभासं
खद्योतालीविलसितनिभां विद्युदुन्मेषदृष्टिम् ॥

( १९ ) तन्वी श्यामा शिखरिदशना पक्वबिम्बाधरोष्ठी
मध्ये क्षामा ¶ चकितहरिणीप्रेक्षणा निम्ननाभिः ।
श्रोणीभारादलसगमना ‡ स्तोकनम्रा स्तनाभ्यां
या तत्र स्याद्युवतिविषये सृष्टिराद्येव धातुः ॥

( २० ) तां जानीथाः परिमितकथां जीवितं मे द्वितीयं
दूरीभूते मयि सहचरे $ चक्रवाकीमिवैकाम् ।
गाढोत्कण्ठां गुरुषु दिवसेष्वेषु गच्छत्सु बालां
जातां मन्ये शिशिरमथितां पद्मिनीं वान्यरूपाम् ॥

( २१ ) नूनं तस्याः प्रबलरुदितोच्छूननेत्रं प्रियाया
निःश्वासानामशिशिरतया भिन्नवर्णाधरोष्ठम् ।
हस्तन्यस्तं मुखमसकलव्यक्ति लम्बालकत्वा-
दिन्दोर्दैन्यं त्वदनुसरणक्लिष्टकान्तेर्बिभर्ति ॥

---

यक्षपत्नीच्या वर्णनाची सुरवात आहे. रतिरहस्यांत सांगितलेलीं "पद्मिनी" स्त्रीचीं हीं लक्षणें आहेत.

१६. **कल्पनासादृश्यः**–त्वं जीवितं त्वमसि मे हृदयं द्वितीयं त्वं कौमुदी नयनयोरमृतं त्वमंगे।
( उत्तर. ३.२६ ).

१७. दीर्घ; लवकर न संपणारे. १८. थंडीच्या कडाक्यानें मलूल झालेली कमलिनी;
**कल्पनासादृश्यः**–( अ ) हिमहतनलिनीवनष्टशोभा व्यसनपरंपरया निपीड्यमाना ।
सहचररहितेव चक्रवाकी जनकसुता कृपणां दशां प्रपन्ना ॥
( रामा. सुन्द. १६.३० ).
(आ) हिमसेकविपत्तिरत्र मे नलिनी पूर्वनिदर्शनं मता ॥ (रघु. ८.४५).

१९. निराळी म्ह० नेहेमीपेक्षां वेगळी. २०. आक्रोशानें. 'आकस' हा शब्द "आक्रोश" या संस्कृत शब्दाचा अपभ्रंश आहे. २१. संस्कृत भाषेंत 'रक्तिमा' हा शब्द पुल्लिङ्गी आहे; पण मराठी भाषेच्या साधारण वाकप्रचारानुसार तो या ठिकाणीं स्त्रीलिङ्गी वापरला आहे. 'रक्तिमा' म्ह० लाली. २२. बहुतांशीं. २३. तुझ्या म्ह० मेघाच्या आवरणामुळें.

२४. **कल्पनासादृश्यः**–मेघलेखापरिक्षिप्ता चन्द्रलेखेव निष्प्रभा । (रामा. सुन्द. ५९. २५).

---

* सुंदर शिखर असलेला. ¶ भ्यालेली ‡ किंचित्. $ चक्रवाकाच्या मादीप्रमाणें.

( २२ ) तेथें तीतें बघसि बहुधा व्यग्र देवार्चनीं कीं ।
किंवा माझें विरहकृशसें कल्पनाचित्र रेखी ॥
मैना मंजुस्वनि भवनिं जी, कौतुकें तीस बाही:—।
" आहे कांहीं स्मरण पतिचें? तत्प्रिया तूंहि बाई " ॥

( २३ ) किंवा वीणा, मलिनवसना, मांडिये घेउनीया ।
माझ्या नांवावरि रचियलें सिद्ध जों गीत गाया ॥
तारा ओल्या नयनसलिलें, त्यां पुसोनीं कसेंही ।
ताना गेल्या फिरफिरुनि, जी विस्मरोनीच जाई ॥

( २४ ) शापांताचे विरहदिवसापासुनी, शेष मास ।
मोजी भूमीवरि रचुनियां देहलीच्या फुलांस ॥
मत्संगा वा मनिं अनुभवी, कल्पनेनें सुखावे ।
स्त्रीव्यापार प्रियविरहिं हे, होति सर्वांस ठावे ॥

( २५ ) सव्यापारा म्हणुनि दिवसा मद्वियोगासि साही ।
कैसेंही ती; परि तिज निशाकाल अत्यंत दाही ॥
तेव्हां रात्रौ तिज सुखविण्या देइं माझा निरोप ।
शय्या जीची अवनि, नच ये लेशही जीस झोंप ॥

( २६ ) टाकी भूमीवरि विकलसें पार्श्वभागें शरीर ।
प्राचीमूलीं गमतचि कलाशेष ती चंद्रकोर ॥
नेली[12] रात्री न कळत जिनें-मीहि-इच्छारतांनीं[13] ।
कंठी आतां विरहगुरु[14] ती[15], उष्णशा आंसवांनीं ॥

---

१. विरहामुळें कृश असें. २. विचारित असेल. ३. जिचीं वस्त्रें मळकट आहेत अशी. ४. रचलेलें; रचियलेलें. ५. फिरुन फिरुन तालीम करून पाठ केलेल्या तानासुद्धां, गावयास सिद्ध झाली असतां, विसरून जाते, व गातां येत नाहीं. ६. उंबरठ्यावरील. ७. रात्रीचा वेळ:

**कल्पनासादृश्य:**—कार्यान्तरितोत्कण्ठं दिनं मया नीतमनतिकृच्छ्रेण ।
अविनोददीर्घयामा कथं नु रात्रिर्गमयितव्या ॥ ( विक्रमो. ३. ४. ).

८. मुळांत " विरहशयने " आहे. विरहावस्थेंत स्त्रिया भूमीवर निजत असत. ९. बाजूनें;



किंवा वीणा, मलिनवसना, मांडिये घेउनीया।
माझ्या नांवावरि रचियलें सिद्ध जों गीत गाया॥
तारा ओल्या नयनसलिलें, त्यां पुसोनीं कसेंही।
ताना गाल्या फिरफिरुनि, जी विस्मरोनीच जाई॥

पृ. ४२

श्लोक २३ पहा.

( २२ ) आलोके ते निपतति पुरा सा बलिव्याकुला वा
मत्सादृश्यं* विरहतनु वा भावगम्यं लिखन्ती ।
पृच्छन्ती वा मधुरवचना सारिकां पञ्जरस्थां
कच्चिद्भर्तुः स्मरसि रसिके त्वं हि तस्य प्रियेति ॥

( २३ ) उत्सङ्गे वा मलिनवसने सौम्य निक्षिप्य वीणां
मद्गोत्राङ्कं विरचितपदं गेयमुद्गातुकामा ।
तन्त्रीमार्द्रां नयनसलिलैः सारयित्वा कथञ्चि-
द्भूयो भूयः स्वयमपि कृतां मूर्च्छनां विस्मरन्ती ॥

( २४ ) शेषान्मासान्विरहदिवसस्थापितस्यावधेर्वा
विन्यस्यन्ती भुवि गणनया देहलीदत्तपुष्पैः ।
मत्सङ्गं वा हृदयनिहितारम्भमास्वादयन्ती
प्रायेणैते रमणविरहेष्वङ्गनानां विनोदाः ॥

( २५ ) सव्यापारामहनि न तथा पीडयेन्मद्वियोगः
शङ्के रात्रौ गुरुतरशुचं * निर्विनोदां सखीं ते ।
मत्संदेशैः सुखयितुमलं पश्य साध्वीं निशीथे
तामुन्निद्रामवनिशयनां $ सौधवातायनस्थः ॥

( २६ ) आधिक्षामां विरहशयने संनिषण्णैकपार्श्वां
प्राचीमूले तनुमिव कलामात्रशेषां हिमांशोः ।
नीता रात्रिः क्षण इव मया सार्धमिच्छारतैर्या
तामेवोष्णैर्विरहमहतीमश्रुभिर्यापयन्तीम् ॥

---

कुशींवर. १०. पूर्वक्षितिजावर. ११. एकच कला बाकी राहिलेली, क्षीण अशी चंद्रकोर; **कल्पनासादृश्य**:—कलाशेषा मूर्तिः शशिन इव नेत्रोत्सवकरी । (मा. मा. २.३). १२. घालविली; संपविली. १३. इच्छा वाटेल त्या क्रीडा व विलास करून (केव्हांच, न कळतां घालविली). १४. विरहामुळे गुरु, म्ह० मोठी, संपतां न संपणारी. १५. ती, म्ह० तीच रात्री.

---

* मन रिझविण्यास कांहीं नसलेल्या. $ वाड्याच्या खिडकींत बसून.

( २७ ) शीतांशूचे किरण विवरें[1] येति जे, पूर्वरागें[2] ।
भेटूं जातां, दचकुनि सखी येतसे शीघ्र मागें ॥
दुःखें[3] डोळे सजल[4]जडशा पापण्या झांकितात ।
तेव्हां भासे भुइकमलसें दुर्दिनीं[5] अर्धसुप्त[6] ॥

( २८ ) शुद्ध[7]स्नानें सडक बनुनी गालिं जे केश येती ।
त्यांतें जीचें श्वसन डुलवी, लोपवी ओष्ठ[8]कान्ती ॥
वांछी निद्रा, मनिं धरुनि जी, आस मत्संगमाची ।
स्वप्नींही; ती असुलभ परी अश्रुभारें जियेसी ॥

( २९ ) बांधी आद्यीं विरहदिनिं जी, फेंकुनी पुष्पमाला ।
शापांतीं जी, विसरुनि रुंजा, सिद्ध मी सोडण्याला ॥
कष्ट[12]स्पर्शा, कुटिल[13]जटिला, वाढलेल्या नखांनीं ।
गालीं[14] आली, फिरफिरुनियां सारिते, एकवेणी[15] ॥

( ३० ) झाली खेदें कृशतनु, धरी देह यत्नें कसाही ।
राही शय्येवरिच बहुधा, भूषणांतें न साही ॥
तूतेंही ती नवजलमयें आसवें ढाळवील ।
होई प्रायें मृदुलमन तो, जो स्वयें आर्द्रशील ॥

---

१. खिडकींतून. २. पूर्वीच्या आवडीमुळें; जे चंद्रकिरण सुखी दांपत्यांस आल्हादकारक होतात, तेच विरहिनांस अत्यंत तापदायक होतात; म्हणून यक्षस्त्री चंद्रकिरणांपासून दचकून परावृत्त होते, व घाईनें मागें येते;

**कल्पनासादृश्यः**—तव कुसुमशरत्वं शीतरश्मित्वमिन्दो-
द्वयमिदमयथार्थं दृश्यते मद्विधेषु ॥ ( शा. ३. ३ ).

३. दुःखामुळें. ४. सजल म्ह० पाण्यानें भरलेल्या, व जड अशा. ५. मेघाच्छादित आकाश असलेल्या दिवशीं. ६. सूर्यविकासी कमलांवर मेघाच्छादित आकाशांतील सूर्यकिरण पूर्णपणें न पडल्यामुळें, तीं अर्धवट उमलतात. ७. तेल, उटणें वगैरे न लावितां केलेलें स्नान; अशा स्नानानंतर केंस रांठ, शुष्क, व सडक असे होतात. ८. ओठांवरची कान्ती म्ह० तेज;

९. **कल्पनासादृश्यः**—( अ ) न च सुवदनामालेख्येऽपि प्रियामसमाप्यताम्
मम नयनयोरुद्बाष्पत्वं सखे न भविष्यति ॥ ( विक्रमो. २.१० ).

( २७ ) पादानिन्दोरमृतशिशिराञ्जालमार्गप्रविष्टा-
न्पूर्वप्रीत्या गतमभिमुखं संनिवृत्तं तथैव ।
चक्षुः खेदात्सलिलगुरुभिः पक्ष्मभिश्छादयन्तीं
साभ्रेऽह्नीव स्थलकमलिनीं न प्रबुद्धां नसुप्ताम् ॥

( २८ ) निःश्वासेनाधरकिसलयक्लेशिना विक्षिपन्तीं
शुद्धस्नानात्परुषमलकं नूनमागण्डलम्बम् ।
मत्संभोगः कथमुपनयेत्स्वप्नजोऽपीति निद्रा-
माकाङ्क्षन्तीं नयनसलिलोत्पीडरुद्धावकाशाम् ॥

( २९ ) आद्ये बद्धा विरहदिवसे या शिखा दाम हित्वा
शापस्यान्ते विगलितशुचा तां मयोद्वेष्टनीयाम् ।
स्पर्शक्लिष्टामयमितनखेनासकृत्सारयन्तीं
गण्डाभोगात्कठिनविषमामेकवेणीं करेण ॥

( ३० ) सा संन्यस्ताभरणमबला पेशलं धारयन्ती
शय्योत्सङ्गे निहितमसकृद्दुःखदुःखेन गात्रम् ।
त्वामप्यस्त्रं नवजलमयं मोचयिष्यत्यवश्यं
प्रायः सर्वो भवति करुणावृत्तिरार्द्रान्तरात्मा ॥

---

**कल्पनासादृश्यः**—प्रजागरात्खिलीभूतस्तस्याः स्वप्ने समागमः ।
बाष्पस्तु न ददात्येनां द्रष्टुं चित्रगतामपि ॥ ( शा. ६. २२ ).

१०. मनस्ताप. ११. प्रोषितभर्तृकेची जटा झालेली वेणी, विरहकाल संपतांच प्रियकरानें सोडून बांधावयाची असा प्रघात होता. १२. कष्टाय स्पर्शः यस्याः; जिला स्पर्श केल्यानें कष्ट होतात अशी. १३. गुंतागुंत झालेली व अव्यवस्थित. १४. आलेली. १५. 'एकवेणी' म्ह० गुंतागुंत होऊन एकवटलेला केशसंभार;

**कल्पनासादृश्यः**—( अ ) नियमक्षाममुखी धृतैकवेणिः " ( शा. ७.२१ ).
( आ ) एकवेणीधरा दीना भर्तृचिन्तापरायणा ।
अधःशय्या विवर्णाङ्गी पद्मिनीव हिमागमे ॥ ( रामा. सुन्द. ५९.३० ).

१६. किडकिडीत देहाची. १७. तुझ्या नवीन पाण्याच्या रूपानें; तुझें नवजल हेंच जणुं तुझे अश्रु. १८. तूं पाण्यानें ओथंबलेला असल्यामुळें, दयामय असलाच पाहिजेस; येथें "आर्द्र" या शब्दावर श्लेष आहे.

( ३१ ) ठेवी माझ्यावरि तव सखी प्रेम अत्यंत तेणें ।
कल्पीं तीची प्रथमविरहें ही अवस्था मनानें ॥
मिथ्या मातें वदवि नच हें, फोल सौभाग्यगर्व ।
थोड्या कालें तुज कथियलें देखसी तेंच सर्व ॥

( ३२ ) होतां केशावृत, नच जया फेंकितां ये कटाक्ष ।
गेला तैसा विसरुनि, सुरा सूटतां, भ्रूविलास ॥
जातांची तूं जवळि, मुकला कांजळा, नेत्र डावा ।
मीनोत्थानें कमलदलसा पापणीनें स्फुरावा ॥

( ३३ ) आतांशा जी ममनखकृतां प्रेमचिन्हां वरी न ।
मोत्यांच्याही चिरपरिचितें जाळकें जी विहीन ॥
संभोगांतीं हळु हळु करें, नित्य जी मी चुरावी ।
डावी मांडी; तशिच, कदलीस्तंभगौरा, स्फुरावी ॥

( ३४ ) तैशा कालीं, जलधर ! जरी ती सुखें झोंप घेई ।
तेथें तीची प्रहरभरि तूं मूकसा वाट पाही ॥
स्वप्नीं तेव्हां दयितें तिज मी लाधलों जों सुदैवें ।
गाढाश्लेषांतुनि नच तिनें तत्क्षणीं वेगळावें ॥

( ३५ ) तीतें जागी करुनि पवनें, शीतशा स्वांबु-जाली ।
होतां ताजी, विकसित कळीं जाइची कीं जहाली ॥
जीची, विद्युत्सख ! बससि तूं त्या गवाक्षीं खिळेल ।
दृष्टी, तीतें, चतुर ! सुगिरा गर्जुनी हीच बोल ॥

---

१. मी कल्पना करतों. २. कथियलेलें; वर्णिलेलें; जें मी आतांपर्यंत वर्णिलें तें. ३. केसांत गुरफटलेला, आवृत झालेला, व त्यामुळें ज्या डोळ्याला कटाक्ष फेंकतां येत नाहींत, असा; बरेच दिवस न विंचरल्यामुळें केंस डोळ्यावर येतात. ४. सुरा म्ह० मद्य. ५. भुवयांचे खेळ; मद्यपानानें स्त्रियांचे भ्रू-विलास विशेष मनोरम होतात, असा भावार्थ आहे. अन्वयः– "तैसा, सुरा सूटतां, भ्रू-विलास विसरुनि गेला ". दारू सुटल्यामुळें डोळा भ्रू-विलास विसरला. ५. काजळाला मुकलेला. ७. माशांच्या चळवळीमुळें जसें कमलाचें पान हालतें, तद्वत् पापणी स्फुरण पावते.

८. स्फुरेल; **कल्पनासादृश्यः**—तस्याः शुभं वाममरालपक्ष्मराजीवृतं कृष्णविशालशुक्लम् ।
प्रास्पन्दैकं नयनं सुकेश्या मीनाहतंपद्ममिवाभिताम्रम् ॥ (रामा. सुन्द. २९.२).
९. धारण करीत नाहीं. १०. जाळीनें; त्याकाळीं, एकांतांत ढुंगणाभोंवतीं मोत्यांची जाळी गुंडाळत असत.

११. **कल्पनासादृश्यः**–अङ्के निधाय करभोरु यथासुखं ते संवाहयामि चरणावुत पद्मताम्रौ॥
( शा. ३.१८ ).

( ३१ ) जाने सख्यास्तव मयि मनः संभृतस्नेहमस्मा-
दित्थंभूता प्रथमविरहे तामहं तर्कयामि ।
वाचालं मां न खलु सुभगंमन्यभावः करोति
प्रत्यक्षं ते निखिलमचिराद्भ्रातरुक्तं मया यत् ॥

( ३२ ) रुद्धापाङ्गप्रसरमलकैरञ्जनस्नेहशून्यं
प्रत्यादेशादपि च मधुनो विस्मृतभ्रूविलासम् ।
त्वय्यासन्ने नयनमुपरिस्पन्दि शङ्के मृगाक्ष्या
मीनक्षोभाच्चलकुवलयश्रीतुलामेष्यतीति ॥

( ३३ ) वामश्चास्याः कररुहपदैर्मुच्यमानो मदीयै-
र्मुक्ताजालं चिरपरिचितं त्याजितो दैवगत्या * ।
संभोगान्ते मम समुचितो हस्तसंवाहनानां
यास्यत्यूरुः सरसकदलीस्तम्भगौरश्चलत्वम् ॥

( ३४ ) तस्मिन्काले जलद यदि सा लब्धनिद्रासुखा स्या-
दन्वास्यैनां स्तनितविमुखो याममात्रं सहस्व ।
माभूदस्याः प्रणयिनि मयि स्वप्नलब्धे कथंचि-
त्सद्यःकण्ठच्युतभुजलताग्रन्थि गाढोपगूढम् ॥

( ३५ ) तामुत्थाप्य स्वजलकणिकाशीतलेनानिलेन
प्रत्याश्वस्तां सममभिनवैर्जालकैर्मालतीनाम् ।
विद्युद्गर्भः स्तिमितनयनां त्वत्सनाथे गवाक्षे
वक्तुं धीरः स्तनितवचनैर्मानिनीं प्रक्रमेथाः ॥

---

१२. केळीच्या गाभ्यासारखी गौरवर्ण.

१३. कल्पनासादृश्यः—गजेन्द्रहस्तप्रतिमश्च पीनस्तयोर्द्वयोः संहतयोः सुजातः ।
प्रस्यन्दमानः पुनरूरुरस्या रामं पुरस्तात् स्थितमाचचक्षे ॥ (रामा. सुन्द. २९.४).

१४. कल्पनासादृश्यः—एकवारावधिर्यामो रतस्य परमो मतः ।
चण्डशक्तिमतो यूनोरद्भुतक्रमवर्तिनोः॥ ( रतिस. मल्लिनाथ ).

१५ मुकाट्यानें; गर्जना केल्याशिवाय. १६. 'दयित' म्ह० प्रियजन. १७. गाढ आलिंगनांतून; आश्लेष म्ह०आलिंगन. १८. तुझ्या जलकणवृष्टीमुळें थंड झालेल्या. १९. "सममभिनवैर्जालकैर्मालतीनाम् " याचा अर्थ चिपळुणकर ' जातिकुसुमांनीं युक्त असे जलकण,' असा करितात; मल्लिनाथ "समम्" याचा अर्थ 'सारखी' असा करून, त्याचा संबंध "प्रत्याश्वस्तां" या शब्दाकडे लावतात, तेंच बरोबर दिसतें. २०. विजेचा सहचर. (विजेच्या चकचकाटामुळें यक्षपत्नीची नजर मेघाकडे जाते ). २१. खिडकीवर. २२. गोड अशी भाषा, वचनें.

---

* दुर्दैवामुळें.

(३६) " जाणीं मातें घन, अविधवे[1]!, त्वत्पतीचा सखा, गे! ।
आणी त्याचें कुशलवच, जें मन्मनीं[2] पूर्ण जागें ॥
जो पांथांतें, पथिं विरमल्या स्वगृहा हांकवाया ।
गर्जे मंदध्वनि, रमणिच्या वेणिमोक्षा[3] कराया ॥ "

(३७) हें ऐकोनीं, पवनतनया[4] जानकी जेविं, तूतें ।
पाहे आशाभरित हृदयें, दावि ती आदरातें ॥
लावी सारा लय तव वचीं, सौम्य!; वार्ता प्रियाची ।
आली मित्राकडुनि, अबलां[5] संगकल्पाचि[6] साची ॥

(३८) तीतें माझी विनति गणुनी, तूं कृती[7] व्हावयास[8] ।
तैसा, सांगें:- प्रियजन तुझा रामगिर्याश्रमास ॥
आहे, देहें कुशल, विरही; तो तुझें क्षेम बाहे[9] ।
पृच्छा[10] आधीं सुलभविपदां[11] प्राणियां हीच आहे ॥

(३९) झाली त्याची वपु कृशतरा, तापवी पंचबाण ।
डोळे येती भरुनि, झुरतो नित्य सोत्कण्ठ जाण ॥
उष्णोश्वास प्रसरति, अशा व्याधिनीं त्यास[12]-जीव ।
कल्पी[13] त्या त्या दुरूनि[13] तुज, जों रोधि मार्गा कुदैव ॥

(४०) जें सांगावें उघड[14] तुजला मैत्रिणीच्या समीप ।
तेंही कानीं कथि, धरूनि[15] जो आननस्पर्शलोभ ॥
तो, गे! दृष्टिश्रवणविषयांपासुनी[16] दूर होतां ।
धाडी प्रेमोत्कंट[17] मम मुखें या निरोपासि आतां ॥

---

१. 'अविधवें' हा शब्द कवीनें खुबीनें वापरला आहे. निरोप सांगण्यापूर्वी ' तुझा पति जिवंत आहे ' असें सुचविण्याचा उद्देश आहे. या श्लोकापासून मेघसंदेश सुरू झाला. २. जें मी नीट लक्षांत ठेवून आलों आहे. ३. गुंतलेल्या वेण्या सोडविण्यासाठीं. ४. मारुतीला; ( सीतेनें जसें आदरानें पाहिलें तसें ). ५. अबलां म्ह० अबलांना. ६. ' संगकल्पा ' म्ह० जवळ जवळ संयोगासारखीच. ७. कृतकृत्य. ८. माझ्या विनंतीस मान द्यावा म्हणून, व त्याप्रमाणेंच परोपकारानें कृतकृत्य होऊन मनाचे समाधान व्हावें म्हणून. ९. विचारतो. १०. चौकशी. हा सर्वसाधारण सिद्धांत आहे; यक्षयक्षिणीपुरताच नाहीं. संकटें, रोग व मरण मनुष्याच्या पांचवीस पुजल्यासारखीं असल्यामुळें, कोणीही मनुष्य दुसऱ्याला भेटला तर पहिल्यान्दां " कसें काय, खुशाल आहेस ना ? ' असें विचारतो. ११. " सुलभविपदां " हें विशेषण यक्ष व यक्षपत्नीसच उद्देशून आहे, असा मर्यादित अर्थ.

( ३६ ) भर्तुर्मित्रं प्रियमविधवे विद्धि मामम्बुवाहं
तत्संदेशैर्हृदयनिहितैरागतं त्वत्समीपम् ।
यो वृन्दानि त्वरयति पथि श्राम्यतां प्रोषितानां
मन्द्रस्निग्धैर्ध्वनिभिरबलावेणिमोक्षोत्सुकानि ॥

( ३७ ) इत्याख्याते पवनतनयं मैथिलीवोन्मुखी * सा
त्वामुत्कण्ठोच्छ्वसितहृदया वीक्ष्य संभाव्य चैवम् ।
श्रोष्यत्यस्मात्परमवहिता सौम्य सीमन्तिनीनां
कान्तोदन्तः सुहृदुपनतः संगमात्किंचिदूनः ॥

( ३८ ) तामायुष्मन्मम च वचनादात्मनश्चोपकर्तुं
ब्रूयादेवं तव सहचरो रामगिर्याश्रमस्थः ।
अव्यापन्नः कुशलमबले पृच्छति त्वां वियुक्तः
पूर्वाभाष्यं सुलभविपदां प्राणिनामेतदेव ॥

( ३९ ) अङ्गेनाङ्गं प्रतनु तनुना गाढतप्तेन तप्तं
सास्रेणाश्रुद्रुतमविरतोत्कण्ठमुत्कण्ठितेन ।
उष्णोच्छ्वासं समधिकतरोच्छ्वासिना दूरवर्ती
संकल्पैस्तैर्विशति विधिना वैरिणा रुद्धमार्गः ॥

( ४० ) शब्दाख्येयं यदपि किल ते यः सखीनां पुरस्ता-
त्कर्णे § लोलः कथयितुमभूदाननस्पर्शलोभात् ।
सोऽतिक्रान्तः श्रवणविषयं लोचनाभ्यामदृष्ट-
स्त्वामुत्कण्ठाविरचितपदं मन्मुखेनेदमाह ॥

---

चिपळुणकर व त्यांचे अनुयायी लावितात, त्यामुळें श्लोकाचें सौंदर्य बरेंचसें कमी होतें. १२. 'व्याप्त-जीव' म्ह० ज्याचा जीव ग्रासून गेला आहे असा. १३. माझी अवस्था अशी आहे, तेव्हां, मी दूर असलों तरी सहानुभूतीच्या योगानें, तुझीही स्थिती तशीच असली पाहिजे, त्या त्या व्याधींनीं तुझाही जीव ग्रस्त होत असेल, अशी कल्पना मी करूं शकतो. १४. चार लोकांसमोर; जें गुप्त नाहीं. १५. ( जें उघड सांगण्यासारखें आहे, तें देखील ) तुझ्या तोंडाला स्पर्श करण्याची संधि मिळावी या लोभानें, कानांत सांगतो. १६. तो दिसणार नाहीं, किंवा त्याचें भाषणही ऐकूं येणार नाहीं इतका दूर गेला असल्यामुळें. १७. तुझ्यावरील गाढ प्रेमानें ओथंबलेला.

---

* मान वर करून. § उतावळा.

(४१) श्यामां[1] देखें, तव तनुच कीं; एणिनेत्रीं[2] कटाक्ष; ।
चंद्रीं वक्त्रद्युतिहि; शिखिच्या बर्हभारांत[3] केश; ॥
भ्रूभंगांचा तटिनि[4]लहरी भास देती कसाही ।
चण्डी[5]! एकांतहि[6] परि तुझें साम्य संपूर्ण नाहीं ॥

(४२) पाषाणीं तूं प्रणयकुपिता[7] गैरिकें[8] रेखियेली ।
काढूं पाहें मज तव पदीं नम्रसा त्याचवेळीं ॥
बाष्पावेग प्रबल मम तों दृष्टि झांकोनि टाकी[9] ।
चित्रींही[10] ना हतविधि सहे आपुल्या संगमा[11] कीं ॥

(४३) मी आकाशीं भुज पसरितां गाढ आलिंगण्यातें ।
तूतें, कष्टें दिसासि कधिंही जेधवां स्वप्निं मातें ॥
ऐशा दीना बघुनि बहुधा देवताही वनांत ।
मोत्यें जैसीं, तरुकिसलयीं आसवें ढाळितात ॥

(४४) भेदूनीयां नवकिसलयां देवदारुद्रुमांच्या ।
तद्गंधानें दरवळुनियां, दक्षिणे वाहती ज्या ॥
वातोर्मी, त्या तुहिन[12]गिरिच्या सेवुनी सौख्य मानी[13] ।
काया पूर्वी, गुणवति! तुझी स्पर्शिली कीं तयांनीं[14] ॥

---

१. श्यामालता, प्रियंगुलता; श्यामालतां, ही जणुं तुझी तनुच आहे, या भावनेनें त्या लतेकडे मी पाहतों. २. हरिणीच्या डोळ्यांत, तुझे कटाक्ष मला दिसतात. ३. (मोराच्या) पिसांच्या ठिकाणीं;

**कल्पनासादृश्यः**—मृदुपवनविभिन्नो मत्प्रियाया विनाशा-।
द्घनरुचिरकलापो निःसपत्नोऽस्य जातः । (विक्रमो. ४.२२).

४. तटिनि म्ह० नदी;—लहरी म्ह० लहान लाटा.

**कल्पनासादृश्यः**—तरङ्गभ्रूभङ्गा क्षुभितविहगश्रेणिरशना । (विक्रमो. ४.५२).
५. मुळांतील "चण्डि" या शब्दाचें प्रयोजकत्व समजत नाहीं. मल्लीनाथ, इतर पदार्थांशीं आपल्या सौंदर्याची तुलना केल्यामुळें यक्षपत्नीस राग आला असला पाहिजे, असें गृहीत धरून या शब्दाचा "कोपना" असा अर्थ करतो. ६. तुझ्या अंग-प्रत्यंगांचा आभास कांहीं वस्तूंच्या ठिकाणीं झाला तरी, तुझें समष्टिरुपसादृश्य मात्र एकांतही आढळत नाहीं. ७. गाढ प्रेमामुळें रागावलेली. ८. गेरूनें.

९. **कल्पनासादृश्यः**—बाष्पस्तु न ददात्येनां द्रष्टुं चित्रगतामपि ॥ (शा. ६.२२).
१०. मी गेरूनें दगडावर तुझें तूं प्रेमातिशयामुळें रागावली आहेस, असें चित्र काढतों. पुढें, तुझ्या पायाशीं मी नम्र होऊन बसलों आहे असें आणखी चित्र काढणार तोंच आंसवानें

( ४१ ) श्यामास्वङ्गं * चकितहरिणीप्रेक्षणे दृष्टिपातं
वक्त्रच्छायां शशिनि शिखिनां बर्हभारेषु केशान् ।
उत्पश्यामि प्रतनुषु नदीवीचिषु भ्रूविलासा-
न्हन्तैकस्मिन्क्वचिदपि न ते चण्डि सादृश्यमस्ति ॥

( ४२ ) त्वामालिख्य प्रणयकुपितां धातुरागैः शिलाया-
मात्मानं ते चरणपतितं यावदिच्छामि कर्तुम् ।
अस्रैस्तावन्मुहुरुपचितैर्दृष्टिरालुप्यते मे
क्रूरस्तस्मिन्नपि न सहते संगमं नौ कृतान्तः ॥

( ४३ ) मामाकाशप्रणिहितभुजं निर्दयाश्लेषहेतो-
र्लब्धायास्ते कथमपि मया स्वप्नसंदर्शनेषु ।
पश्यन्तीनां न खलु बहुशो न स्थलीदेवतानां
मुक्तास्थूलास्तरुकिसलयेष्वश्रुलेशाः पतन्ति ॥

( ४४ ) भित्त्वा सद्यः किसलयपुटान्देवदारुद्रुमाणां
ये तत्क्षीरस्रुतिसुरभयो दक्षिणेन प्रवृत्ताः ।
आलिङ्ग्यन्ते गुणवति मया ते तुषाराद्रिवाताः
पूर्वं स्पृष्टं यदि किल भवेदङ्गमेभिस्तवेति ॥

---

माझे डोळे भरून येतात, व चित्र काढवत नाही; जणुं काय दुष्ट दैव चित्रांत देखील आपला समागम होऊं देऊं इच्छित नाहीं;

**कल्पनासादृश्यः—**

शशिनि खलु कलङ्कः कण्टकाः पद्मनाले दयितजनवियोगो दुर्भगत्वं स्वरूपे ।
जलधिजलमपेयं पण्डिते निर्धनत्वं धनवति कृपणत्वं रत्नदोषी कृतान्तः ॥

( सु. र. भां. पृ. ९७ श्लो. ८५ ).

११. वायुलहरी. १२. हिमालय पर्वताच्या. १३. मी त्या वायुलहरी सेवून सुख मानतों; ( कारण, हे गुणवति ! त्या उत्तरेकडून दक्षिणेकडे वाहत असल्यामुळें, तुझी काया स्पर्शून, माझ्यापर्यंत आल्या असतील ). १४. त्या वातोर्मींनीं;

**कल्पनासादृश्यः**—( अ ) उन्मीलन्मुकुलकरालकुन्दकोशप्रच्योतद्घनमकरन्दगन्धबन्धो ।
तामीषत्प्रचलविलोचनां नताङ्गीमालिङ्गन्पवन मम स्पृशाङ्गमङ्गम् ॥ ( मा. मा. १.४१ ).

(आ) वाहि वात यतः कान्ता तां स्पृष्ट्वा मामपि स्पृशेः ।
बद्धेतत्कामयानस्य शक्यमेतेन जीवितुम् ॥ ( रामा. कि. १.५३ ).

---

* भ्यालेल्या.

(४५) जाई मातें क्षणसम कशी, दीर्घ ही काळरात्र
तैसा ताप प्रखर न दिवा[1] जाळि हें क्षीण गात्र[2] ॥
ऐशा, माझें मन, सुनयने !, दुर्लभ[3] प्रार्थनेनें[4] ।
तेवीं तूझ्या असहविरहें जाहलें दीनवाणें ॥

(४६) राहें येथें सुख समजुनी; मीच आधार[5] मातें ।
तूंही चित्ता स्थिर करुनियां, धीर सोडी न, कान्ते ॥
कोणा लाधे सुखचि सगळें, दुःख तैसें सदाची ।
होतीं खालींवरि सतत हीं भाग्यचक्रें[6] नरांचीं ॥

(४७) होई, शेषावरुनि उठतां[7] श्रीहरी, शाप पूर्ण ।
चारी मासां म्हणुनि उर्रल्या[8], लोटिं डोळे मिटोन ॥
आकांक्षा ज्या[9] प्रबल विरहें, चिंतितों ज्या मनांत ।
तंपूं[10] आम्ही[11] मग शारदिंच्या[12] स्वच्छशा चांदण्यांत ॥

(४८) मागें, माझ्या निबिड विळखा घालुनीयां गळ्यातें ।
मोठ्यानें तूं रडत उठसी, झोंपली[13], आठवे तें ? ॥
पृच्छा[14] केल्या फिरुनि फिरुनी बोलेसी[15], हांसुनीयां ।
"पाही स्वप्नीं, शठ ! रमविता[16] दूसरीतें !" वचा या ॥

(४९) सांगे कीं हें गुंपित[17] तुज, मी क्षेम हें तूं गणावें ।
खोट्या वार्ता परिसुनि मला तूं न दोषी[18] म्हणावें ॥
स्नेहा येई विरम विरहें, हें न साचें; अभोगें ।
तें सांचोनी प्रणयविषयीं, सागराची सरी घे ॥

---

१. दिवसां; वर उत्तरमेघ श्लोक २५ व त्यावरील टीप पहा. २. गात्र म्ह० शरीर. ३. ( जी प्रार्थना ) निष्फल, लाभण्यास कठीण, ( अशी ); कोठली प्रार्थना ? तर, ही दीर्घ काळरात्र, क्षणासारखी मला कशी निघून जाईल, व दिवसां प्रखर विरहतापानें हें शरीर कसें जळून न जाईल, ही. ४. प्रार्थना, म्ह० इच्छा. ५ येथें मला दुसऱ्या कोणाचा आधार नाहीं, माझा आधार मीच आहे. ६. जसा चक्राचा खालचा भाग वर येऊन, वरचा भाग, चक्र फिरल्यानें, खालीं जातो, तसेंच मनुष्याचें नशीब खालींवर हेलकावे खातें; म्हणून, भाग्यास चक्राची उपमा दिली आहे;

**कल्पनासादृश्यः**—(अ) चक्रवत्परिवर्तन्ते दुःखानि च सुखानि च ॥
(सु. र. भां. पृ. १६९ श्लो. ४५९).

(आ) तेजोद्वयस्य युगपद्व्यसनोदयाभ्यां लोको नियम्यत इवात्मदशान्तरेषु ॥ (शा. ४.१).
७. कार्तिकी ( प्रबोधिनी ) एकादशीस भगवान योगनिद्रेंतून उठतात. ८. उरलेल्या. ९.'ज्या' म्ह० ज्या ज्या इच्छांचें सतत चिंतन करित आहोंत, व ज्या विरहामुळें प्रबळ होत आहेत त्या त्या, हें " तं तं " या शब्दप्रयोगाचें भाषांतर आहे. १०. पुऱ्या करूं. ११. आपण

( ४५ ) संक्षिप्येत क्षण इव कथं दीर्घयामा त्रियामा
*सर्वावस्थास्वहरपि कथं मन्दमन्दातपं स्यात् ।
इत्थं चेतश्चटुलनयने दुर्लभप्रार्थनं मे
गाढोष्माभिः कृतमशरणं त्वद्वियोगव्यथाभिः ॥

( ४६ ) नन्वात्मानं बहु विगणयन्नात्मनैवावलम्बे
तत्कल्याणि त्वमपि नितरां मागमः कातरत्वम् ।
कस्यात्यन्तं सुखमुपनतं दुःखमेकान्ततो वा
नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण ॥

( ४७ ) शापान्तो मे भुजगशयनादुत्थिते शार्ङ्गपाणौ
शेषान्मासान्गमय चतुरो लोचने मीलयित्वा ।
पश्चादावां विरहगुणितं तं तमात्माभिलाषं
निर्वेक्ष्यावः परिणतशरच्चन्द्रिकासु क्षपासु ॥

( ४८ ) भूयश्चाहं त्वमपि शयने कण्ठलग्ना पुरा मे
निद्रां गत्वा किमपि रुदती सस्वनं विप्रबुद्धा ।
सान्तर्हासं कथितमसकृत्पृच्छतश्च त्वया मे
दृष्टः स्वप्ने कितव रमयन्कामपि त्वं मयेति ॥

( ४९ ) एतस्मान्मां कुशलिनमभिज्ञानदानाद्विदित्वा
मा कौलीनाच्चकितनयने§ मय्यविश्वासिनी भूः ।
स्नेहानाहुः$ किमपि विरहे ध्वंसिनस्ते त्वभोगा-
दिष्टे वस्तुन्युपचितरसाः प्रेमराशीभवन्ति ॥

दोघे. १२. चार महिने संपल्यावर शरदृतु लागेल, तेव्हांच्या. १३. झोंपलेली असतां. १४. चौकशी. १५. बोलसी, "वचा या". १६. दुसरीसंगतीं रममाण होत होतां, असें मला स्वप्न पडलें, (हें रडत उठण्याचें कारण). १७. यक्ष ही एक अत्यंत गुप्त गोष्ट सांगत आहे. उद्देशः—हा मेघ खरोखरीच यक्षानें धाडलेला दूत आहे, आणि निरोप यक्षाकडूनच आला आहे अशी यक्षाच्या पत्नीची खात्री व्हावी. १८. मी दुसऱ्या स्त्रीच्या नादीं लागलों आहें, अशा खोट्या अफवा खऱ्या मानून मला दोषी समजूं नकोस. १९. विरहामुळें;

कल्पनासादृश्यः—(अ) नद्या इव प्रवाहो विषमशिलासंकटस्खलितवेगः ।
विघ्नितसमागमसुखो मनसिशयः शतगुणी भवति ॥ ( विक्रमो. ३.८ ).

(आ) नहि भवति वियोगः स्नेहविच्छेदहेतुर्जगति गुणनिधीनां सज्जनानां कदाचित् ।
घनतिमिरनिबद्धो दूरसंस्थोऽपि चन्द्रः किमु कुमुदवनानां प्रेमभङ्गं करोति ॥
( सु. र. भां. पृ. ५३ श्लो. २१८ ).

* कोणत्याही अवस्थेंत, § हे हरिणाक्षी ! $ म्हणतात.

( ५० ) आश्वासोनी, प्रथमविरहें गांजिल्या त्वत्सखीतें।
ऐशा रीतीं, तदनु परतें, सोडुनी त्या गिरीतें॥
सोभिज्ञानें, कुशलवचनें, तन्मुखींच्या, मदीया।
प्रातःकुंदापरि शिथिलशा जीविता सांवरीं या॥

( ५१ ) या कार्याचा मग तव शिरीं घेसि का सांग भार?।
मौनें ऐशा मज नच गमे, कीं दिला तूं नकार॥
याञ्चा होतां जल वितरिसी चातकां शब्दहीन।
संतां अर्थिप्रतिवच दुजें कार्यसिद्धी विना न॥

( ५२ ) सांगें तूतें अनुचितचि हें कार्य तेंही करावें।
बंधू किंवा विधुर गणुनी, कीं दयेच्या स्वभावें॥
जाईं स्वेच्छें, घन! मग रुचे जेथ, वर्षार्तुपुष्ट।
व्हावें त्वां न क्षणभरि तडिद्वल्लभेसीं वियुक्त॥

---

१. गांजिलेल्या. २. ( माझी पत्नी व ) तुझी सखी. ३. नंतर. ४. हिमालयास; कैलास पर्वतास. ५. खुणेसहित. ६. मेघाकडून 'होय' म्हणून उत्तर मिळणें अशक्य आहे हें समजून, कवीनें या कोटिक्रमानें युक्तीनें अडचणींतून आपली सुटका करून घेतली आहे. ७. याचकांस प्रत्युत्तर;

**कल्पनासादृश्यः**—शरदि न वर्षति गर्जति, वर्षति वर्षासु निःस्वनो मेघः।
नीचो वदति न कुरुते वदति न सुजनः करोत्येव॥
( सु.र. भां. पृ. ४९ श्लो. ११४ ).

८. तुझ्या सारख्या महापुरुषास अयोग्य असें दूतकार्य. ९. मागें उ. मे. श्लो. ३० मध्यें 'आर्द्रशील' असें मेघाचें विशेषण आलें आहे. १०. पावसाळ्यामुळें ज्याची शोभा वृद्धिंगत झाली आहे असा. ११. विद्युल्लता हीच प्रिया, तिच्या पासून वियुक्त ( तूं, माझ्यासारखें न व्हावें; हा आशिर्वाद आहे).

**कल्पनासादृश्यः**—सर्वे मामनु ते प्रियाविरहजां त्वं तु व्यथां मानुभूः॥ (विक्रमो.४.४७).

(५०) आश्वास्यैवं प्रथमविरहोदग्रशोकां सखीं ते
§शैलादाशु *त्रिनयनवृषोत्खातकूटान्निवृत्तः ।
साभिज्ञानप्रहितकुशलैस्तद्वचोभिर्ममापि
प्रातः कुन्दप्रसवशिथिलं जीवितं धारयेथाः ॥

(५१) कच्चित्सौम्य व्यवसितमिदं ¶बन्धुकृत्य त्वया मे
प्रत्यादेशान्न खलु भवतो धीरतां कल्पयामि ।
निःशब्दोऽपि प्रदिशसि जलं याचितश्चातकेभ्यः
प्रत्युक्तं हि प्रणयिषु सतामीप्सितार्थक्रियैव ॥

(५२) एतत्कृत्वा $प्रियमनुचितप्रार्थनावर्तिनो मे
सौहार्दाद्वा विधुर इति वा मय्यनुक्रोशबुद्ध्या ।
इष्टान्देशाञ्जलद विचर प्रावृषा संभृतश्री-
र्माभूदेवं क्षणमपि च ते विद्युता विप्रयोगः ॥

इति महाकवि श्रीकालिदासविरचिते मेघदूते काव्ये
उत्तरमेघः समाप्तः ।

---

§ त्वरित. * शंकराच्या नंदीनें शिखरें विदारलेल्या. ¶ मित्राचें काम. $ इष्टकार्य.

---

**याप्रमाणें महाकवि श्रीकालिदास यानें रचिलेल्या**
**मेघदूत नांवाच्या काव्यांतील**

# उत्तरमेघ समाप्त

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | जागा | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| ८ | अभिनंदन टीपा | ४ | ह्रातासारख्या | ह्रातांसारख्या |
| १० | प्रस्तावना | २० | निसर्गोचें | निसर्गाचें |
| १२ | ,, | ५ | उगवून | उमलून |
| ,, | ,, | २४ | पर्वतांवर | पर्वतावर |
| १४ | ,, | २४ | केशकलापांवर | केशकलापावर |
| १६ | ,, | ५ | मुठींना | मुठींनीं |
| ,, | ,, | ६ | यक्षांच्य | यक्षांच्या |
| २१ | ,, | ६ | सहशनादवादी | सदृशनादवाही |
| २३ | ,, | १५ | नेमिदूत | नेमीदूत |
| २४ | प्रस्तावना टीपा | १ | तस्यांः | तस्याः |
| ,, | ,, | ४ | पीनस्तयोर्द्वयो | पीनस्तयोर्द्वयोः |
| ६ | भाषान्तर | १६ | वनतटिनिचें | वनतटिनिंचें |
| ८ | ,, | १३ | दावाग्नीते शमविसि पुरा | पूर्वी दावानल शमविसी |
| १८ | भाषान्तर टीपा | १३ | अठा | आठ |
| २० | भाषान्तर | १५ | नाचवीच | नाचवींच |
| २० | टीपा | ४ | व्यलोकयेत् | व्यलोकयत् |
| २२ | भाषान्तर | २ | पृथुतर | प्रवितत |
| ,, | टीपा | ११ | पाडून | पाहून |
| २३ | संस्कृत श्लोक | ६ | पक्ष्मोक्षेपादुपविलसत् | पक्ष्मोक्षेपादुपरिविलसत् |
| ,, | ,, | १५ | तासामभिगममपा | तासामभिगममपां |
| २४ | भाषान्तर | १८ | करिती | करिति |
| २५ | संस्कृत श्लोक | ४ | लम्गोमहस्ता | लम्गोर्मिहस्ता |

| पृष्ठ | जागा | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| २६ | भाषान्तर | २ | जिला | जिये |
| २७ | ,, | ४ | तुजवरुनिया | तुजवरुनियां |
| ,, | ,, | १४ | गंगारूपीं | गंगारूपी |
| ३३ | टीपा | ५ | रति-उत्पादक | रत्युत्पादक |
| ,, | ,, | ८ | थंडवाऱ्यानें | थंडवाऱ्यानीं |
| ३४ | भाषान्तर | १६ | विभ्राजाख्योपवनिं | वैभ्राजाख्योपवनिं |
| ३५ | टीपा | ८ | मोकळेपणें पडल्यामुळें | मोकळेपणें न पडल्यामुळें |
| ३८ | भाषान्तर | ३ | बिजली | बिजलि |
| ३८ | भाषान्तर | १४ | तैसे | तैसीं |
| ४५ | संस्कृत श्लोक | ४ | नसुप्ताम् | न सुप्ताम् |
| ,, | ,, | १४ | निहितमसकृद्दःखदुःखेन | निहितमसकृद्दुःखदुःखेन |
| ४७ | ,, | २ | दित्थंभूता | दित्थंभूतां |
| ,, | ,, | ५ | रुद्धापाङ्ग | रुद्धापाङ्ग |
| ५२ | भाषान्तर | २ | तैसा ताप प्रखर न दिवा जाळि हें | न ग्रासावें कधिंहि दिवसा आतपें |
| ,, | टीपा | १ | दिवसां | दिवसा |
| ५३ | टीपा | २ | " वर्चा या " | " वचा या " |
| ५४ | भाषान्तर | १२ | व्हावें त्वां न | व्हावें न त्वां |